**जातीनिष्ठ राजकारणाकडून राष्ट्रीय एकात्मतेकडे**

*जनवाणी दिवाळी अंक १९७८*

गतवर्षी केन्द्रस्थानी जनता पक्ष सत्तेवर आला तेव्हा आपण सर्वांनी त्यापासून काही निष्कर्ष काढले. तत्त्वशून्य, स्वार्थी, व बेबंद राजकारणाचे युग भारतीय मतदारांनी संपुष्टात आणले हा त्यापैकी एक निष्कर्ष होता. गतवर्षी काढलेला निष्कर्ष बरोबर नव्हता असे आता आपणास आढळून आले आहे.

खुद्द जनता पक्षाची प्रतिमा आज उज्ज्वल राहिलेली नाही. जनता पक्षात एकत्र आलेले घटक पक्ष हे आपापल्या जुन्या आग्रही भूमिका सोडून एका नव्या वैचारिक भूमिकेवरून एकत्र आले आहेत, हा गैरसमज असल्याचे लक्षात आले आहे. महात्मा गांधींचे नाव घेतले तरी ते सोयीपुरते आहे ही गोष्ट लक्षात आली आहे. आणी - बाणीतील राजवट हे या साऱ्या पक्षांवरचे जिवावरचे संकट होते. ते परतवून लावावयाचे तर आपण एक होणे आवश्यक आहे ही गोष्ट, जानेवारी १९७७ मध्ये निवडणूका जाहीर झाल्यावर, स्पष्टपणे लक्षात आली. जनता पक्षाच्या स्थापनेमागील प्रेरणा सर्वस्वी उच्च स्वरूपाची नव्हती; काही प्रमाणात आपले राजकीय अस्तित्व टिकविण्यासाठी मजबुरीने त्यांना एकत्र यावे लागले होते. गेल्या वर्षभराच्या काळात एकात्म पक्षबांधणीच्या दृष्टीने प्राथमिक पावलेही टाकता आलेली नाहीत यावरून हीच गोष्ट उघड झाली आहे.

अनपेक्षितरीत्या सत्ता हाती आली तेव्हा जनता पक्षाची महत्त्वाकांक्षा अधिक मोठी झाली. सर्व देशभर आपल्या हाती सत्ता असावी अशी आकांक्षा निर्माण झाली. ज्या राज्यांमध्ये जनता पक्षाला लोकसभांच्या निवडणुकीत अभूतपूर्व यश मिळाले तेथे त्या यशाचे कारण पुढे करून विधानसभा बरखास्त करून निवडणुका घेण्याचा निर्णय केला गेला. पक्षातील काही मंडळींची इच्छा तर सर्वच राज्यांमध्ये निवडणुका घेण्याची असावी. जनता पक्षाच्या तत्त्वच्युतीला येथे आरंभ झाला. निवडणुकांमध्ये हमखास यश मिळावे या दृष्टीने पक्षात ' आयारामां' ची भरती मोठ्या प्रमाणावर केली गेली. त्यांना पक्षात अधिकारपदे दिली गेली, निवडणुकीसाठी तिकिटे दिली गेली. जुना काँग्रेस पक्ष आणि हा नवा जनता पक्ष यांच्या व्यवहारात फारसे अंतर राहिले नाही.

श्रीमती इंदिरा गांधींचे व्यक्तिवादी, सत्तालोलुप आणि प्राधि- कारवादी राजकारण कायमचे गाडले गेले असे गतवर्षी वाटले होते. त्यांना काँग्रेस पक्षाचे अध्यक्षपदी बसवावे असा बूट निघाला तेव्हा त्याला विरोध झाला. त्या मुद्यावरून काँग्रेस परत एकवार दुभंगली; यशवंतराव चव्हाण, ब्रह्मानंद रेड्डी, करणसिंग प्रभृतींनी अखेरीस एकदा खंबीरपणा दाखवून इंदिरा गांधींना एकाकी पाडले म्हणून समाधान वाटले. पण हे समाधान फार काळ टिकले नाही. फेन्द्रवारी १९७८ मधील निवडणूकांमध्ये कर्नाटक, आंध्र व महाराष्ट्रातील विदर्भ या भागात त्यांनी इतके घसघशीत यश संपादन केले की, आपलीच काँग्रेस ही खरी कॉंग्रेस हा त्यांचा दावा योग्य आहे अशी हवा देशात निर्माण झाली. इतकेच नाही तर, उद्या पुन्हा त्या सत्तेवर येण्याची शक्यता सर्वाना वाटू लागली. त्यासरशी त्यांच्या पक्षात सामील होणाऱ्यांचा एक प्रवाह उत्पन्न झाला. जनता पक्ष सोडून इंदिरा कॉंग्रेसमध्ये जाण्याचे प्रमाण आज नगण्य असले तरी ते उद्याही तसेच राहील याचा काही भरंवसा नाही.

**मध्यममार्गाचे रहस्य**

या सर्व घटना पहाता भारतीय राजकारणाची बैठक, त्याचे स्वरूप आणि त्याचा आशय यामध्ये मूलभूत असा फरक पडलेला नाही हे स्पष्ट होते. जनता पक्षाची वर्षभराची राजवटही जुन्या काँग्रेसच्या वळणाचीच म्हणजे मध्यममार्गी राहिलेली आहे ही देखील वरील निष्कर्षास पुष्टी देणारी गोष्ट आहे. हे मध्यममार्गित्व पण विशेष प्रकारचे आहे. एका सर्वागीण, सुसंवादी व एकात्म अशा वैचारिक बैठकीचा तो स्वाभाविक अविष्कार नाही किंवा कोणत्याही विचारप्रणालीला घट्टपणे बांधून न घेता त्या त्या वेळी समोर असलेल्या समस्येची त्या त्या वेळेपुरती उकल करीत जाणेच योग्य मानणाऱ्या व्यवहारवादी भूमिकेचाही तो परिणाम नाही. डाव्या किंवा उजव्या विचारप्रणालीचे आग्रह धरणारे पक्ष वा गट राजकीय पक्षांमध्ये वरचढ आहेत. कॉंग्रेसमध्ये असे परस्परविरोधी गट एकत्र होते. जनता पक्षातही ते आहेत. त्यांच्यात स्वाभाविक रस्सीखेच निर्माण होते. कोणत्याही प्रश्नाची उकल करतांना दीर्घत्री बाळगून तत्वनिष्ठ भूमिका घेणे अशक्य ठरते. मग पक्षांतर्गत गटांचे बलाबल लक्षात घेऊन, सर्वोच्चे समाधान करणाऱ्या भूमिका घेतल्या जातात. घेतलेली

भूमिका वरकरणी सुवर्णमध्य साधणारी दिसते पण वस्तुतः ती परस्पर विसंगत धोरणांची व कार्यक्रमांची भेसळ असते. प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने ती उपकारक नसते. विचारप्रणालीच्या आग्रहातून येणारा साचेबंद - पणा आणि तडजोडीतील तत्वशून्यता असा दुहेरी दोष निर्माण होतो. जुन्या काँग्रेस पक्षाचे आणि जनता पक्षाचे मध्यममार्गीपण एकाच जातकुळीचे ठरेल अशी लक्षणे दिसत आहेत.

जनता पक्षाच्या नेत्यांनी आपल्या पक्षाचे अधःपतन सुखासुखी होऊ दिले असेल असे मानण्याचे कारण नाही. केन्द्रात सत्ता अनपेक्षितरीत्या आली. जनता पक्षाला देशव्यापी पुरेशी बैठक असती तर त्या पक्षास नव्या आधारांसाठी पक्षाचे दरवाजे उघडे ठेवण्याची गरज पडली नसती. योगायोगाने आलेली सत्ता राखावयाची असेल तर आणि केन्द्राप्रमाणेच सर्व राज्यांमध्ये आपल्या हाती सत्ता यावयाची असेल तर जनता पक्षाचा झपाट्याने विस्तार करण्याची गरज पक्षाच्या नेत्यांनी ओळखली. आजच्या समाजात त्या त्या स्थानिक क्षेत्रात बलिष्ठ असलेल्यांना, त्यांची फार कसोशीने पहाणी न करता, प्रवेश देण्याचे राजकारण त्यांना अपरिहार्यपणे करावे लागले. यात त्यांची मजबूरी होती हे आपण समजून घेतले पाहिजे.

तत्त्वशून्य, स्वार्थी राजकारणी व्यक्तींचा प्रभाव भारतीय राजकारणावर इतका जबरदस्त का आहे? ही गोष्ट समजून घेण्यासाठी आपणास भारतीय समाजाच्या वैशिष्ठयाकडे वळले पाहिजे, तसेच अलीकडच्या दोन एकशे वर्षातला इतिहासही पाहिला पाहिजे.

### जाती-जमातींचे कूपमंडुक विश्व

भारतीय समाज जातजमातधिष्ठित होता. या समाजात एकेका जातीजमातीचे स्थान व कार्य ठरवून दिलेले होते. राज्य करण्याचे काम सर्वांचे नव्हते. ती जबाबदारी राज्यकर्त्या जातजमातीची वा घराण्याची. अशा समाजात आपली जात वा जमात यात सर्वसाधारणपणे माणसाच्या आकांक्षाच्याही परिसीमा ठरतात. महत्वाकांक्षी व्यक्तींना या परिघातच आपल्या महत्त्वाकांक्षेला वाव शोधावा लागतो. या कूपमंडूक जगात कर्तबगार माणसांना ऐहिक जीवनात आपली कर्तबगारी सत्तास्पर्धेत प्रकट करण्याखेरीज दुसरा मार्ग रहात नाही. भाऊबंदकी, गटबाजी यांना मग ऊत येतो. या सत्तास्पर्धेला कोणतेही व्यापक परिमाण वा ध्येय असत नाही. कारण त्या त्या गटासमोर मोठी आव्हाने नसतात. जीवन बंदिस्त असते. वैयक्तिक वर्चस्वासाठी चाललेली चुरस असे या जगातल्या राजकारणाला रूप प्राप्त होते. वर्चस्व प्राप्त करून समाजाला काही वेगळे वळण द्यावयाचे नसते, समाजाची घडी विस्कटावयाची नसते. वर्चस्वासाठी वर्चस्व असे हे विशुद्ध राजकारण असते. जातीजमातीमध्ये ठराविक भूमिका वाटून : दिलेल्या समाजजीवनातील गतीमानताही विशिष्ट स्वरूपाची असते. : व्यक्तिशः आपले किंवा आपल्या गटाचे वा जातीचे स्थान उंचावणे, अधिक धन वा सत्ता संपादन करणे अशी उद्दिष्टे असतात. पण व्यापक समाजव्यवस्था नव्या पायावर संघटित करण्याचे उद्दिष्ट समोर नसण्याचीच शक्यता जास्त. एकंदर समाजाच्या हिताचा व अभ्युदयाचा विचारही अभावानेच आढळतो. अशा समाजात 'राजे'- पदी विराजमान होणाऱ्या वतनदार वर्गातही असेच विशुद्ध सत्तास्पर्धेचे राजकारण फोफावत असते.

एका मोठ्या प्रदेशाकडे हा आपला प्रदेश ( realm), हे आपले लोक या दृष्टीतून पाहणारे, त्यांच्या सुखसमृद्धीची चिंता वाहण्याची जबाबदारी डोळसपणे पार पाडणारे राजे येथे झालेच नाहीत असे नाही, पण ती परंपरा क्षीण राहिली. हिंदुस्थानच्या इतिहासात दीर्घकाळ परकीय आक्रमणे होत राहिली आणि त्यांना येथे सहजपणे यश येत गेले याचे कारण पुढीलप्रमाणे सांगता येईल. इथल्या राज्यसत्तेची बांधणीच मुळी अशी आहे की प्रत्येक पातळीवर 'बळी तो कान पिळी' या न्यायाने प्रथापित केलेला जित-जेते संबंध आढळून येई. व्यक्तिगत सत्तालालसा हीच उभयतांना प्रेरणा देत असल्याने जेत्या राजाचा पराभव जर कोणी परका करीत असेल तर त्यात जित व्यक्तीला आनंदच होई. कारण आपल्या सत्ताकांक्षेला पडलेली वेसण दूर झाली असे त्यास वाटे. व्यक्तिगत सत्ताकांक्षेपलीकडे एखाद्या संकल्पनेस वा ध्येयास असलेल्या निष्ठेने कोणी कोणास बांधलेले नसल्याने अशी राज्ये दडपणाखाली ठिसूळ ठरणे स्वाभाविक होते.

अशा रीतीने, अनिर्बंध वैयक्तिक सत्ता संपादन करण्याचे उद्दिष्ट हे भारतात वैध आणि प्रतिष्ठित मानले गेले. किंबहुना असे दीर्घ कालखंड इतिहासात आढळतात. जेव्हा सत्ता संपादण्याचे अन्य काही उद्दिष्ट असते हे येथे माहितच नव्हते असे म्हणता येते.

ब्रिटिश राजवट येथे प्रस्थापित होण्यापूर्वीचा काळ हा या प्रकारचा कालखंड होता. सत्तास्पर्धेच्या ओघात स्वार्थी व बेबंद सत्तालोलुप

व्यक्तींना पुढे आणण्याचा, हाताशी धरण्याचा उद्योग सुरू झाला. त्यामुळेच मुघल साम्राज्याचा -हास ओढवला. शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापले असे आपण म्हणतो, हे माझे लोक, हा माझा देश, त्यांच्या भल्यासाठी हे राज्य ही निष्ठा हे त्यांच्या राज्याचे अधिष्ठान होते. शिवशाही आणि पेशवाई यांच्यातला फरकही हाच आहे की ही निष्ठा उत्तरोत्तर लोप पावत गेली. मराठ्यांचे राज्य बुडाले ते याचमुळे.

आपली सामाजिक रचना आणि अलिकडचा इतिहास या दोन्हींचा एकत्रित विचार केला तर जातिजमातींच्या परिसीमांमधील वैयक्तीक गटबाजीचे राजकारण आणि त्या चौकटीबाहेर सत्तेचे स्वार्थी, बेबंद राजकारण अशी आपल्या राजकारणाची जातकुळी राहिली आहे.

## राष्ट्रीय स्वातंत्र्याची व्यापक कल्पना

स्वातंत्र्यलढ्याच्या राजकारणाचा याला अपवाद नाही का? याचे उत्तर अर्थातच होकारार्थी आहे. हा आपला देश, हे आपले लोक ही निष्ठा स्वातंत्र्याच्या राजकारणाच्या पाठीशी होती, जातजमात व धर्म निरपेक्ष राष्ट्रवादी भूमिकेचा अंगिकार राष्ट्रसभेने आपल्या स्थापनेपासून केला.

स्वातंत्र्याच्या राजकारणात पुढारीपण केलेल्या व्यक्ती महत्वा- कांक्षेपासून मुक्त होत्या असे अर्थातच नाही. पुढारीपण करण्याची आकांक्षा तर त्यांच्या ठिकाणी होतीच. त्यांच्यापैकी अनेकांच्या ठिकाणी सत्ताकांक्षाही होती. कॉँग्रेस संघटनेत पुढाऱ्यांमध्ये चुरस होती, गट होते असे आपणास आढळते. मात्र जातीजमातीच्या कूपमंडूक रिंगणात फिरत राहणारी त्यांची महत्वाकांक्षा नव्हती. तसेच त्यांची सत्ताकांक्षा बेबंद व स्वार्थी नव्हती. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या ध्येयाची त्या सत्ताकांक्षेला वेसण होती.

राष्ट्रीय स्वातंत्र्याची संकल्पना केवळ राजकीय नव्हती. राजकीय स्वातंत्र्य हे देशाच्या आर्थिक व सामाजिक अभ्युदयासाठी आहे; सर्व व्यक्तीमधील जातपात धर्मविरहीत समानता, न्याय आणि व्यक्तींविकासाचे स्वातंत्र्य यांच्या आधारेच हा अभ्युदय घडून येणार आहे, याविषयी अगदी प्रथमपासून स्पष्टता होती. राष्ट्रसमेने प्रारं भीच्या काळात अस्पृश्यांच्या मुक्ततेच्या दिशेने ठोस पावले टाकली नसतील, पण स्वतंत्र हिंदुस्थानात स्पृश्यास्पृश्य असा मेद राहता कामा नये. याची स्पष्टता पुढाऱ्यांच्या ठिकाणी होती, जाती नष्ट व्हाव्यात असे फार कोणास वाटत नव्हते, पण समानतेच्या भूमिके- वरून जातीमधील व्यवहार व्हावेत अशी कल्पना होती. देशाचे भले कशात आहे, त्याचे मार्ग कोणते, यासंबंधी पुढाऱ्यांची समज उथळ होती असे कोणी म्हणू शकेल पण व्यापक ध्येयदृष्टीचा अभाव होता असे म्हणता यावयाचे नाही.

मग प्रश्न असा पडतो की, राजकीय स्वातंत्र्य मिळाल्यानंतर दीर्घकाळ याच कॉंग्रेसच्या हाती सत्ता राहूनही ध्येयवादी राजकार- णाच्या परंपरेचा जवळपास पूर्ण अस्त कॉँग्रेसच्या राजकारणातून का झाला? एकंदरीतच ध्येयवादी राजकारण हे सांदीकोपऱ्यात ढकलले गेल्यासारखे का झाले? ध्येयवादी राजकारणाचा अगदी लोप झाला असे आजही आपणास म्हणता येत नाही. पण त्याची पुष्कळ पिछेहाट झाली आहे. आणि आपण सुरवातीस पाहिल्याप्रमाणे, ज्या कोणत्या पक्षाला आज सत्ता हस्तगत करायची असेल वा टिकवायची असेल त्याला स्वार्थी, संकुचित राजकारण करणाऱ्या शक्तींना आपल्यामध्ये सामावून घ्यावे लागते. असे का झाले? ध्येयवादी राजकारणाच्या प्रभावाखाली इतर राजकीय शक्तींचे परिष्करण का झाले नाही त्यांचे उन्नयन का झाले नाही? किंवा अखेरीस त्यांचे उच्चाटन का झाले नाही?

## स्थानिक स्वराज्य संस्थांचे संकुचित राजकारण

ब्रिटिश राजवट ही परकी साम्राज्यवादी राजवट होती. ती प्राधिकारवादी राजवट होती. या दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत. पण, त्याचवेळी, ब्रिटिश राजवट ही घटनात्मक सनदशीर राजवट होती; आणि १८६१ सालापासून लोकांना राज्यकारभारात काही सहभाग. असला पाहिजे हे तत्व म्हणून स्वीकारले गेले होते. मुंबईसारख्या शहरांमध्ये नगरपालिकांची निर्मिती तर कंपनी सरकारच्या काळातच झालेली होती. सांगावयाचा मुद्दा असा की, स्वातंत्र्यासाठी चळवळीचे राजकारण एकीकडे चालू अससानाच दुसरीकडे, एका मोठ्या क्षेत्रात, प्रातिनिधिक लोकशाहीतले राजकारण पण अस्तित्वात होते स्वातंत्र्याच्या राजकारणाला ध्येयवादाची बैठक होती तर या

'स्थानिक स्वराज्या' च्या राजकारणाला ती अभावानेच होती. अगदी आरंभीच्या काळात स्थानिक स्वराज्य संस्थांकडे स्वराज्याचे शिक्षण देणाऱ्या शाळा म्हणून पाहिले गेले. राष्ट्रसभेचे ज्येष्ठ पुढारी त्यांच्या आयुष्यातला काही काळ स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये कार्य करीत होते असेही दिसते! असे असले तरी, अपवाद सोडता, ध्येयनिष्ठ स्वातंत्र्याच्या राजकारणा- चेच एक अंग म्हणून स्थानिक स्वराज्य संस्थांचे राजकारण फार काळ सर्व देशभर चालविले गेले असे आढळत नाही. प्रांतिक आणि वरिष्ठ कायदे कौन्सिलांमधील राजकारणदेखील स्वातंत्र्याच्या राजकारणा पासून तसे वेगळेच राहिले. १९३५ चा कायदा अंमलात येईपर्यंतच्या काळाबाबत असे आपणास म्हणता येईल.

राजकारणाच्या या दुसऱ्या क्षेत्रात स्वार्थी वैयक्तीक व गट राज- कारणच प्रभावी राहिले असे आपणास आढळून येते. समाजातील पारंपारिक प्रतिष्ठित च सत्ताधारी गट स्वातंत्र्याच्या राजकारणापासून दूर राहावेत ही ब्रिटिशांची नीती होती. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या आणि कायदे कौन्सिलांच्या राजकारणात या गटांना त्यांनी बुदध्याच जास्त उठाव मिळेल, प्रतिनिधित्व मिळेल असे कायदेकानू केले, कायद्यांतर्गत नियम केले. स्वार्थी, संकुचित व्यक्तिगत व जातजमात- निष्ठ राजकारणासाठी राखून ठेवलेले क्षेत्र अशीच व्यवस्था त्यांनी केली. नगरपालिका याला काही प्रमाणात अपवाद होत्या कारण शहरात नवशिक्षित पांढरपेशा मध्यमवर्गियांचा प्रभाव त्यांना रोखता येत नव्हता पण नगरपालिकांचे अधिकार इतके मर्यादित होते की स्वातंत्र्याच्या संसदबाह्य राजकारणाला गती आली तसे नगरपालिकांचे क्षेत्र हे स्वार्थी, संकुचित राजकारणासाठी मोकळे सोडून दिल्यासारखे झाले.

ब्रिटिश राजवटीच्या काळात नियंत्रित व मर्यादित प्रातिनिधिक लोकशाहीचा टप्प्याटप्प्याने विस्तार होता गेला. स्वातंत्र्य मिळाले त्यावेळी ही प्रातिनिधिक लोकशाहीची घडी इतकी बसलेली होती की ब्रिटिशांनी या घडीनुसार अधिकारावर आलेल्या वरिष्ठ कार्य- 'कारी मंडळाच्या हातीच सत्तेचे हस्तांतर केले. या कार्यकारी मंडळात काँग्रेसचेच पुढारी होते, आणि हस्तांतराच्या क्षणी काँग्रेसने एक राष्ट्रीय मंत्रिमंडळ बनविले या गोष्टी खऱ्या, पण मुद्याची गोष्ट अशी की, स्वातंत्र्याच्या चळवळीच्या बाहेर असलेल्या, त्या राजकारणापासून जाणीवपूर्वक दूर राहिलेला असा एक मोठा प्रवाह अस्तित्वात होता. आणि त्याला दूर न सारताच, त्याच्यावर निर्णायकरित्या कुरघोडी न करताच वरिष्ठ राजकीय सत्ता काँग्रेसच्या हाती आली.

प्रतिनिधिक राज्यव्यवस्थेत निवडून येणारे प्रतिनिधी हे मर्यादित अर्थाने लोक प्रतिनिधि होते. त्यांच्या सत्तेचे आधार पारंपारिक होते. जातजमातनिष्ठ व सरंजामशाही समाजातील त्यांचे बलिष्ठ व उच्च स्थान हे त्यांचे बळ असे. राष्ट्रसभेच्या स्वातंत्र्यांच्या राजकारणाला हिंदी लोकांमधूनच शह बसावा, ते खच्ची व्हावे म्हणून राजकारणाचे पारंपारिक आधार ब्रिटिशांनी जाणीवपूर्वक जोपासले. जातजमात व धर्म न मानणाऱ्या, सरंजामशाहीस विरोध करणाऱ्या आधुनिक लिबरल राजकीय प्रवाहाला दुबळे करण्यासाठी वेगवेगळ्या पातळ्यांवर जागांचे वाटपही पारंपारिक गटांना पक्षपातीपणे केले. या सगळ्यामुळे स्वातंत्र्य मिळाले तेव्हा जातजमातनिष्ठ, सरंमजामशाही राजकारणाचा हा प्रवाह चांगलाच जोरदार होता. राज्यसत्तेच्या रचनेतील वरिष्ठ पातळ्या सोडल्या तर इतर पातळ्यांवर त्यांची पकड होती.

### सनदी नोकरशाहीचे फुटीर राजकारण

आपण हिंदुस्थानातील सर्व जनतेने प्रतिनिधित्व करतो असा राष्ट्रसमेचा दावा होता. हा दावा खोटा आहे इंग्रजी शिक्षण घेत- लेल्या हिंदू व त्यातही उच्चवर्णीय बाबू लोकांपलीकडे कोणाच्या हितसंबंधाचे प्रतिनिधित्व राष्ट्रसमा खऱ्या अर्थाने करीत नाही असा प्रतिवाद येथील सनदी नोकरशाही करीत असे. आपले म्हणणे खरे करण्याच्या उद्देशाने तसेच राष्ट्रसभेचे राजकारण दुबळे करण्याच्या दृष्टीने तिने जातजमातनिष्ठ राजकीय पक्षांना आणि शक्तींना प्रोत्साहन दिले, संघटित होण्यास मदत केली, मुस्लीम लीग हे त्याचे आपणास परिचित असलेले सर्वात ठळक उदाहरण होय. पण येथील ब्राह्मणेतर चळवळी, अस्पृश्यांचे वेगळे संघटन, संस्थानिक यांच्याही फुटीर राज- कीय आकांक्षा ब्रिटिश राज्यकर्त्यांनी जोपासल्या. या ज्या वैयक्तिक व गट हितसंबंधी राजकीय शक्ती ब्रिटिशानी वाढविल्या त्यांनी सगळ्या देशाच्या हिताच्या दृष्टीने विचार करावा अशी अपेक्षा नव्हती अंतिम व सर्वोच्च सत्ता ब्रिटिशांच्या हाती राहावी अशीच या शक्ती जोपासण्यामागील योजना होती आणि तशी अपेक्षाही होती. म्हणजे एकप्रकारे, बुद्ध्याच, स्वार्थी संकुचित रिंगणाच हे राजकारण रहावे, त्याचा परस्परांना व राष्ट्रसभेच्या राजकारणाला छेद जात राहावा अशी योजना होती. साऱ्या समाजाच्या, देशाच्या दृष्टीने या राज-

कारणातल्या आवळ्याभोपळ्यांची मोट बांधण्याचे अधिकार आपल्या हाती राखून ठेवण्याचा आग्रह ब्रिटिशांनी जवळपास अखेरपर्यंत ठेवला. १९४७ मध्ये या अधिकाराचे हस्तांतर ब्रिटिशांनी केले व हा अधिकार भारताच्या संदर्भात राष्ट्रसभेच्या हाती सुपूर्द केला.

वैयक्तिक सरंजामशाही राजकारण, जातजमातनिष्ट राजकारण यांचा एक प्रवाह आणि देशात नवसमाजाची उभारणी करण्याचे आश्वासन दिलेला कॉग्रेसच्या ध्येयवादी राजकारणाचा दुसरा प्रवाह असे दोन प्रवाह स्वातंत्र्यानंतरच्या काळात एकत्र आले. उत्तरोत्तर पहिल्या प्रवाहाने दुसऱ्या प्रवाहावर मात केली असे दृश्य आपणास दिसते.

आपण जी लोकशाही व्यवस्था स्वीकारली तिचा आणि हे जे घडून आले त्याचा घनिष्ट संबंध आहे. लोकशाहीसंबंधी आपल्या देशातील धुरीणांच्या काही कल्पना होत्या. इंग्लंडच्या धर्तीवर आपण प्रौढ मताधिकाराधिष्ठित प्रतिनिधिक लोकशाही राज्यव्यवस्था येथे प्रस्थापित केली की तीमधून ओघानेच जनतेच्या हिताच्या दृष्टीने चालणारे जनतेचे राज्य अस्तित्वात येईल अशी कल्पना होती. त्यासाठी आदर्श स्वरूपाची राज्यघटना तयार करून तिचा स्वीकार करणे हे आपण सर्वात महत्वाचे काम मानले. आदर्श लोकशाही अस्तित्वात येण्यासाठी राज्यघटनात्मक यंत्रणा उभारणे आणि ती दाखवणे पुरेसे आहे अशा स्वरूपाची ती समजूत होती.

इंग्लंडमध्ये लोकशाही अस्तित्वात आल्याने तेथे कोणते बदल घडून आले त्यासंबंधी एक चित्र आपण वागवित होतो. १८३२ च्या पहिल्या रिफॉर्म अॅक्टनंतर वेळोवेळी मताधिकाराचा विस्तार होत गेला त्याबरोबर क्रमाक्रमाने इंग्लिश राजकारणात मजूरपक्ष वरचढ ठरत गेला असे चित्र आपणास दिसत होते. १९४५ साली मजूर पक्षाच्या हाती निर्विवाद सत्ता असल्याने या प्रक्रियेवर कळस चढविला गेला असेच आपणास वाटले. तिथे जे घडले तेच येथेही घडून येईल असे आपण गृहीत धरले.

इंग्लंडमधील कामगार वर्गाची निर्मिती अर्थातच केवळ लोक- शाहीच्या अस्तित्वाने घडून आलेली नाही हे आपणास माहीत होते. औद्योगिक क्रांती आणि भांडवलशाहीचा उत्कर्ष यांचा तो अटळ क्रांतिकारक परिणाम होता. भारतात लोकशाही राज्यव्यवस्था आपण प्रस्थापित केली तशी औद्योगिक क्रांतीही घडवून आणावयास हवी असे आपल्या नेत्यांनी मानलेले होते.

**काँग्रेसचा पारंपारिक शक्तींशी समजौता**

१९५२ साली प्रौढ मताधिकाराच्या बैठकीवर आपल्या देशातील पहिल्या सार्वत्रिक निवडणुका झाल्या. या निवडणुकांच्या वेळी एक राजकीय पक्ष म्हणून देशाच्या सत्तेवर पक्की पकड जमिविणे काँग्रेसला जरुरी होते. देशात राजकारणाचा जो दुसरा प्रवाह होता त्याची शक्ती नगण्य नाही याचे भान काँग्रेस संघटनेतील पुढाऱ्यांना अगदीच नव्हते असे नाही. या देशातील परंपरावादी जनतेला मताधिकार दिल्याने या सरंजामदारी व जातजमातनिष्ठ राजकारणी प्रवाहाची ताकद आपल्यापेक्षाही वरचढ ठरण्याचा धोका काँग्रेसच्या धुरीणांना जाणवला असे दिसते. काँग्रेसमधून समाजवादीही बाहेर पडले होते. आपले यश पक्के करण्याच्या दृष्टीने काँग्रेस संघटनेच्या पुढाऱ्यांनी देशातील पारंपरिक राजकीय शक्तींपैकी अनेक धारा आपल्यात सामील करून घेतल्या. वरिष्ठ पातळीवरील स्वार्थी, संकुचित राज- कारणाशी अशी सांगड साधली गेली.

प्रत्यक्षात लोकशाहीचा व्यवहार कसा चालतो त्यासंबंधीचे एक नागवे सत्य आपल्या ध्यानात येते. लोकशाही राज्यव्यवस्थेत गटांना बर्गाना, जमातीना महत्व असते. ज्या कोणत्या प्रकारच्या गटांमध्ये, जमातींमध्ये, वर्गामध्ये लोकसंख्येची विभागणी झालेली असते त्यांना धरून लोकशाहीतल्या राजकीय शक्ती संघटित होत असतात. लोकशाही प्रक्रिया लोकमानसात रुजलेल्या निष्ठांना घेऊन गटांची राजकीय बांधणी करते; त्या प्रक्रियेद्वारा लोकांच्या ठिकाणी नव्या राजकीय निष्ठा निर्माण होत नाहीत, लोकशाहीची म्हणून जी तात्विक बैठक आहे, तत्वज्ञान आहे त्याच्या प्रभावातून, संस्कारातून नव्या राजकीय निष्ठा निर्माण होऊ शकतात. राज्यकर्त्यांची निवड करण्याच्या राजकीय प्रक्रियेतून - पक्षबांधणी, निवडणुका सत्तासंपादनाचे राजकारण यातून नव्या निष्ठा निर्माण होत नाहीत.

वरिष्ठ सत्तास्थाने काँग्रेसमधील ध्येयवादी राजकारणी शक्तींच्या हाती होती, असे असताना व्यक्तिवादी, गटवादी, जातजमातवादी राजकारणी प्रवाह कालांतराने वरचढ का ठरावा, हा प्रश्न येथे प्रस्तुत ठरतो. ध्येयवादी राजकारणी प्रवाहाचीं इतक्या सहजी दुसऱ्या प्रवाहाशी हात मिळवणी मुळात का होऊ शकली, याचा विचार केला तर वरील प्रश्नाचे अर्धे उत्तर आपणास मिळून जाते.

महात्मा गांधी व पं. जवाहरलाल नेहरू यांच्या प्रभावामुळे काँग्रेसने सामाजिक समता व न्याय यांच्या आधारावर नवा समाज घडविण्याचे ध्येय स्थूलमानाने स्वीकारले होते ही गोष्ट खरी. पण मुख्यत्वेकरून काँग्रेस हा भारतातील आहेरे गटांचाच पक्ष होता, आणि

या गटांची या ध्येयाला असलेली मान्यता ही कल्पनेतच जास्त होती. गांधी-नेहरूंना. राजी राखण्याचा भाग त्यात जास्त होता. वस्तुतः कॉंग्रेस ही एक राष्ट्रवादी आघाडी होती. तिच्या ध्येयवादाचा भरीव असा आशय सीमित होता, भारत एक पुढारलेले, संपन्न व गौरवास पात्र असे राष्ट्र बनावे अशी सामान्य धारणा होती.

## आधुनिकीकरणाच्या प्रक्रियांद्वारे समाज परिवर्तनाचे प्रयत्न

पण त्याहीपेक्षा विकासाविषयीचीं पं. नेहरूंची जी एक विशिष्ट धारणा होती तिचे महत्व या संदर्भात जास्त आहे. आधुनिकी- करणाच्या आणि औद्योगीकरणाच्या प्रक्रियांमधून इष्ट ते समाजमानस घडेल अशी त्यांची श्रद्धा होती. सरकारचे नेतृत्व करून सरकारच्या पुढाकाराने योजनाबद्ध कार्यक्रमांद्वारा या प्रक्रियांना जास्तीत जास्त चालना देण्याचा त्यांनी आपल्या कारकीर्दीत प्रयत्न केला. त्यात त्यांना आलेले यश लक्षणीय होते. पण या प्रक्रियांद्वारे त्यांना अपेक्षित परिवर्तन मात्र घडून आले नाही. त्यांची एक गफलत झाली. ही गफलत केवळ त्यांचीच एक झाली असे मात्र नाही. आपली बहुतेकांचीच ती गफलत झालेली आहे ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे.

या प्रक्रिया स्थल काल निरपेक्ष असत नाहीत आणि त्यांचे परिणामही भारतीय समाज म्हणजे वेगवेगळ्या व असमान ताकदीच्या गटांची एक रचना होती, आणि इथली म्हणून एक वैचारिक-सांस्कृतिक बैठक होती. या पार्श्वभूमीचा विचार न करता आधुनिकी -करणाच्या आणि औद्योगीकरणाच्या प्रक्रियांना चालना दिल्याचा विपरीत परिणाम होणे स्वाभाविक होते. मुळात या प्रक्रिया समता व न्याय प्रस्थापित करणाऱ्या प्रक्रिया नाहीत. त्यात अत्यंत विषम अशा समाजव्यवस्थेत त्या राबविल्या तेव्हा त्या प्रक्रियांचा फायदा आधीपासूनच बलिष्ठ असलेल्या गटांना जास्त बलबान करण्यात झाला.

पण एवढ्यावरच ही गोष्ट थांबत नाही. एकेका समाजाची वैशिष्ट्यपूर्ण अशी वैचारिक- सांस्कृतिक बैठक असते. ही बैठक आधुनिकीकरणाच्या आणि औद्योगीकरणाच्या प्रक्रियांनादेखील आपल्या अनुरूप असा घाट देत असते. राजकारणात जात जमात हा एक प्रभावी घटक बनतो, कामगार संघटनांच्या क्षेत्रातही वर्गीय संघटनेस जातपातीने छेद जातो. इथे खऱ्या अर्थाने व वर्गाचा उदय होतच नाही, या गोष्टी आपण अनुभवीत आहोत.

व्यक्तिवादी, गटवादी, जातजमातवादी राजकारणी प्रवाह - वरचढ ठरण्याशी या सगळ्या गोष्टींचा संबंध आहे.

कोणताही समाज जरी घेतला तरी, तो ज्या वेगवेगळ्या गटांचा, व्यक्तींचा मिळून बनलेला असतो त्या सर्व व्यक्तींचे वा गटांचे हितसंबंध एकसारखे असणे शक्य नाही. मोठे अविभक्त कुटुंब घेतले तरी त्यास आपणास वेगवेगळ्या पोट-गटांमध्ये ताणतणाव आढळ- तात. आपापल्या हितसंबंधांची पूर्तता करण्यासाठी चालणारी रस्सीखेच हाच राजकारणाचा मूलभूत आशय होय असे सार्थपणे म्हणता येईल, अशा हितसंबंधी रस्सीखेचीमधून आपोआप समतोल प्रस्थापित होतो वा व्यवस्था निर्माण होते वा एकात्मता प्रस्थापित होते असे म्हणता येईल का?

तर तसे काही होत नाही. त्यासाठी तीन गोष्टींची गरज असते. एक, रस्सीखेच करणाऱ्यांनी काही मानदंड मानावे लागतात, पथ्ये सांभाळावी लागतात, व्यक्तींनी वा गटांनी मानदंड मान्य करायचे तर असे मानदंड समाजात शिष्टमान्य व प्रस्थापित झालेले असावे लागतात. साऱ्या समाजाच्या हिताचा विचार करून निर्णय घेण्याची, वागण्याची परंपरा समाजात असावी लागते.

## वैयक्तिक सत्ताकांक्षेचा कळस

या संदर्भात भारताचा अलिकडचा इतिहास पाहिला तर आपणास काय आढळते? साऱ्या भारतावर आपले राज्य इंग्रजांनी प्रस्थापित केले आणि त्यामधूनच एकप्रकारे आजचे भारत हे राष्ट्र आकारास आले. भारताच्या सरहद्दींमधील साऱ्या लोकांचा मिळून एक समाज आहे, आणि तो 'आपला भारतीय समाज' आहे ही भावना निर्माण व्हायलादेखील आधी एकछत्री अंमल आपणावर लादला जावा लागला. ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. गावच्या पलीकडील बृहत्तर प्रदेशातील समाजाचे राजकीय संघटन करण्याचा प्रश्न जातपातधिष्ठित हिंदु समाजाला कधी सोडविता आलेला नाही असे दिसते. एक धार्मिक सांस्कृतिक क्षेत्र म्हणून भारताचे आणि भारतीयत्वाचे अस्तित्व पुष्कळ प्राचीन काळापासून आहे असे दिसते. पण राजकीय संघटन साधण्याच्या बाबतीतच एक विशेष

असमर्थता दिसते. या असमर्थतेचा आणि जातिपातींमध्ये समाजाची संरचना झालेली असण्याचा काही निश्चित संबंध आहे. तो संबंध काय ते पाहण्याचा आपण प्रयत्न करू या.

कालपर्यंतच्या भारतीय जातिव्यवस्थेचे एक वैशिष्ट्य या संदर्भात निर्णायक महत्वाचे आहे. जातींची उतरंड रचलेली असे. त्याचा एक परिणाम हिंदू मानसावर खोलवर झालेला आहे. दुसऱ्याशी जेव्हा त्याची गाठ पडते तेव्हा त्याच्या तुलनेत तो आपल्या स्थानाची परीक्षा करतो, आणि आपले स्थान उंचावण्याची त्याची आकांक्षा अतिशय तीव्र असते. आपले स्थान उंचावण्याबद्दल व्यक्ती आणि गट इतके उत्सुक असतात की त्यापोटी ते आपल्या जातीचे विभाजन घडवून आणण्यास कायम तयार असतात. त्यामुळे कोणतीही एक जात घेतली तरी त्या जातीत पुष्कळ पोटजाती आढळतात, आणि व्यव- हारात त्या पोटजातींचे अस्तित्वच खरे असते असे समाजशास्त्रीय- दृष्ट्या आढळते. किंबहुना, जात, वर्ण अमूर्त, प्रत्यक्ष व्यवहारात न आढळणाऱ्या कोटी आहेत असेच आजचे प्रस्थापित मत आहे.

राजकीय क्षेत्रात याचा परिणाम काय होत आहे ते पाहण्या- सारखे आहे. समजा राजपुतांचा एक जथ्था आहे. जथ्थ्यातील सर्वांचे परस्परांशी असे नाते आहे की त्यांचे एकत्र घराणे आहे. या जथ्थ्याने एखादा मोठा प्रदेश जिंकून घेतला आणि तो त्या प्रदेशावर स्थायी झाला. शासनाच्या सोयीसाठी त्या प्रदेशाचे भाग पाडून एकेका भागात एकेक पोट - शाखा शासन करू लागली. तर कालांतराने असे आढळले की त्या पोट- शाखांनी वेगळेच सवतेसुभे उभे केलेले आहेत, त्यांच्यातही आपापसात वरचढ ठरण्यासाठी स्पर्धा चाललेली आहे, आणि त्यापोटी बाहेरच्या कोणाची मदत घेऊन आपल्याच भाईबंदांना खतम करण्याचीही त्यांची तयारी आहे. असे हिंदुस्थानच्या इतिहासात वारंवार घडलेले आपणास पहावयास मिळते. आणि म्हणूनच इथे परचक्रे सहजपणे यशस्वीही होत आली.

एका पातळीवर माणसे आपापल्या जातींच्या परीघात राहत. जात हाच समाज होता. बहुतेक जातींची परिस्थिती अशी असे की राजकीय आकांक्षा त्यांना नसतच दुसरीकडे, ज्या कोणाचे राज्य असेल त्यांच्याशीही आपलेपणाचे काही नाते आहे असे त्यांना वाटण्याचे कारण नसे. त्यांची बांधिलकी असे ती एका बाजूला गावकीला आणि दुसरीकडे जातीला. परिणामी, राज्य हे व्यक्तीचे वा घराण्याचे ठरत असे, आणि राज्य हे राजाच्या स्वार्थासाठी हेही गृहीत असे.

### राज्य ही राजाची व्यक्तिगत बाब

ज्याला 'राजकीय समाज' असे आपण म्हणू शकू असा खऱ्या अर्थाने गावाच्या पातळीवरच काय तो अस्तित्वात होता असे म्हणता येईल. एकेका गावात अनेक जातीचे लोक काही व्यवस्थेत एकत्र राहत असत. ' प्रत्येक खेडेगाव हे एक प्रजासत्ताकच असे ' या अर्थाचे वर्णन एका दृष्टीने यथार्थ होते. पण एका प्रदेशातील अनेक स्वायत्त 'प्रजासत्ताक' खेड्यांमध्ये राजकीयदृष्ट्या दुवा असे, तो कोणता? तर वजनदार वा जहागीरदार वा राजा आणि त्याचा वैयक्तिक अंमल हाच अशा 'स्वायत्त' खेड्यांना एकत्र जोडणारा दुवा असे. तात्पर्य असे की, खेडेगाव सोडले तर ज्याला खऱ्या अर्थाने राजकीय समाज म्हणता येईल असा समाज इतर वरच्या पातळीवर आपल्या देशात अस्तित्वात येण्याच्या आड आपली जातिव्यवस्था कायमची येत राहिली. त्यामुळे या वरच्या पातळ्यांवर लहान मोठी व्यक्तिगत राज्ये तेवढी अस्तित्वात असत. राजकीयदृष्ट्या संघटित व जागृत अशा टोळीपुढेही पत्त्याच्या बंगल्यासारखी ही राज्ये कोसळत याचेही कारण हेच की प्रजेच्या दृष्टीने ते राज्य ही राजाची व्यक्तिगत बाब असे.

अशा व्यवस्थेत प्रत्येक गट वा जात वा जमात आपला स्वार्थी हितसंबंध पुढे रेटण्यासाठी मिळणाऱ्या संधीची तेवढी वाट पहात असे. राज्यसत्ता प्रबळ असेल तेव्हा तिने घातलेले निर्बंध स्वीकारावयाचे ती दुबळी झाली की त्या दुबळेपणाचा फायदा उठवायचा. निर्बंधांना नैतिक मान्यता व प्रमाण नसे. राजकारणात काही मानदंड नव्हते. साहजिकच पथ्ये पाळण्याचा विचार करण्याची गरज कोणास वाटत नव्हती. साऱ्या समाजाच्या हिताहिताचा विचार करण्याची परंपरा निर्माण झाली नाही. यात मग नवल ते काही नाही. राजाचा, वतनदाराचा व्यक्तिगत स्वभाव जसा असेल तसे राज्य बरे वाईट असायचे.

या आपल्या हिंदू समाजाची व्यवस्था धार्मिक सांस्कृतिक प्रकारची होती. योग्यायोग्य विचार हा धार्मिक श्रद्धांच्या, धार्मिक सांस्कृतिक रीतिरिवाजांच्या अनुषंगाने होत असे. धार्मिक सांस्कृतिक व्यवस्थेतून काही एक एकात्मता प्रसार समाजात अस्तित्वात येत असे. जातिव्यवस्था, तिच्यातील एक ना एक प्रकारची उतरंड, उच्च- नीचतेचा भेद, या सर्वांना एक व्यापक मान्यता होती, आणि ही व्यवस्था टिकावी असे सामान्यतः सर्व गटांना वाटे हे खरे पण त्याचवेळी आपले स्थान उंचावण्याची इर्षा प्रत्येक जातीच्या, जाती- तल्या

व्यक्तींच्या वा गटांच्या ठिकाणी असे. जातीचे व व्यक्तीचे वा गटाचे स्थान अंशतः ऐहिक परिस्थितीवर आणि अंशतः राजकीय ताकदीवर आणि अंशतः तत्कालीन राज्यसत्तेच्या अनुकूल वा प्रतिकूल भूमिकेवर अवलंबून असे. यामुळे आपली ऐहिक स्थिती सुधारण्यासाठी, आपली राजकीय ताकद वाढविण्यासाठी जाती, गट वा व्यक्ती जागरूक असत. या स्पर्धेचा, त्यातून निर्माण होणाऱ्या वादंगांचा सततचा ताण व्यवस्थेवर राही. त्या त्या वेळच्या राज्यसत्तेकडे हे एक कामच असे की जातिव्यवस्था स्थिर राखायची. जातीची कामे कोणती, स्थान कोणते यासंबंधीचे निवाडे अखेरीस राजापुढे जात व त्याचा निर्णय अखेरचा असे ही लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे.

या अर्थाने आपल्या पारंपारिक समाजातील एकात्मता ही अत्यंत तकलादू असे. ऐहिक बदलांचा परिणाम म्हणून ज्या जातींची, गटांची वा व्यक्तींची आकांक्षा जागृत झालेली असे त्या जातींचा, गटांचा व व्यक्तींचा हितसंबंध राजकीय अस्थिरतेमध्ये राज्यसत्ता दुबळी असण्यात असे. कारण अशा परिस्थितीतंच आपले स्थान उंचावण्याची सगळ्यात जास्त शक्यता असल्याचे त्यांना वाटे. कोणत्याही पातळीवरील केन्द्रीय राज्यसत्तेकडे पाहण्याचा अंकित गटांचा, जातींचा दृष्टिकोन काय असे तेही यावरून स्पष्ट होते.

## समाजाची धारणा दंडसत्तेच्याच आधाराने

समाज जीवनाचा केवळ ऐहिक संदर्भ जर समोर ठेवला तर समाजाची धारणा ही सरळ सरळ दंडसत्तेच्या आधारे झालेली होती हे विदारक सत्य सामोरे येते. कारण जातींचे, गटांचे, व्यक्तिंचे व्यवहार हे मूलतः अनिर्बंध, बेबंद होते. आपले व्यवहार सगळ्या समाजाच्या हिताचा विचार करून, त्या हिताचा अंकुश पत्करून चालले पाहिजेत अशा प्रकारचे स्वयंशासन ज्यातून निर्माण होते असे नैतिक मानदंडच अस्तित्वात नव्हते. मिळेल त्या संधीचा फायदा उठविण्याचे, तसा तो उठवून बलिष्ठ व सधन बनण्याचे तेवढे आपण बघावे हाच विचार सर्वोच्या ठिकाणी असे. वेसण घालण्याचे, शिस्त लावण्याचे काम करायला राज्यसत्ता आहेच अशी ती भूमिका आहे.

आपल्या संस्कृतीमध्ये संसारातून उठून जाऊन आध्यात्मिक जीवन जगण्याविषयीचे जबरदस्त आकर्षण, आध्यात्मिक विरक्तीला दिले जाणारे सर्वोच्च मूल्य यांचा योग्य उलगडा या पार्श्वभूमीवरच समाधानकारकपणे होऊ शकतो.

## संदर्भ बदलले पण उद्दिष्ट तेच

ब्रिटिशांच्या काळात ऐहिक जीवनाचे काही संदर्भ पार बदलले. धार्मिक सांस्कृतिक सिद्धांतप्रणाली राज्यसत्तेनेच गैर ठरविली. ज्याने त्याने आपल्या कुवतीनुसार ऐहिक उत्कर्ष साधावा, सत्ता संपादन करावी यासाठी सर्वाना दारे खुली केली गेली. कायदेकानू बदलले, ' करार स्वातंत्र्य' हा नव्या व्यवस्थेचा एक मूलाधार ठरला. राजकीयदृष्ट्या प्रातिनिधिक संस्थांचे युग सुरू झाले. या युगात सत्तेसाठी संस्था व संघटन यांना महत्व प्राप्त झाले. संस्था व संघटन यांना महत्व प्राप्त झाल्यावर जातींच्या व्यवहाराच्या क्षेत्रात एक महत्वपूर्ण बदल घडून आला. विभाजनाकडे पूर्वी प्रवृत्ती असे. आता, संयोग साधण्याची प्रवृत्ती निर्माण झाली. प्रादेशिक पातळीवर जातीचे संघटन केले जाऊ लागले, पण उद्दिष्ट तेच राहिले. आपले स्थान उंचावण्यासाठी मत्ता व सत्ता संपादन करावयाची.

या प्रक्रियेला स्वातंत्र्यानंतरच्या काळात गती आल्याचे आपण पाहतो. जो तो गट आपल्या हाती अधिक सत्ता यावी म्हणून धडपडत आहे. सत्ता आली की तिचा वापर करून इतर गोष्टी आपणास मिळविता येतील अशी प्रत्येक गटाची खात्री आहे. कारण सत्ता निरंकुश असते आणि ती स्वार्थासाठी राबवायची असते अशीच परंपरेने बनलेली धारणा आहे.

सत्तेसाठीची स्पर्धा, त्यापोटी प्रतिपक्षीयांवर कुरघोडी करण्यासाठी ज्या त्या गटांचा चाललेला प्रयत्न, त्यातून निर्माण होणारी रस्सीखेच, असे आपल्या आजच्या राजकारणाचे स्वरूप बनलेले आहे.

इतर देशांमध्ये जेथे लोकशाही व्यवस्था अस्तित्वात आहेत तेथेही एका अंगाने याच आशयाचे राजकारण चालते. वेगवेगळे गट आपले हितसंबंध साधण्यासाठी प्रयत्न करीत असतात. तिथल्या व्यक्तींनाही आकांक्षा आणि स्वार्थ सुटला आहे अशातला भाग नाही. मग तिथे जर ते चालू शकते तर इथेच आपण एवढा आक्षेप घेण्याचे कारण काय?

## पाश्चात्य देशातील राजकीय समाजांचे अस्तित्व

इतर देशामध्ये जेथे लोकशाही राज्यव्यवस्था प्रस्थापित झाल्या आहेत तेथे राजकीय समाजाचे अस्तित्व बऱ्याच काळापासून आहे. लोकशाहीच्या प्रस्थापनेच्या आधीपासून राजकीय समाज तेथे अस्ति- त्वात आहेत. या देशांमध्ये साऱ्या देशाचा कारभार करण्याची जबाबदारी आपली आहे, तो आपला विशेषाधिकार आहे ते आपले मिशन आहे अशी धारणा असलेले गट पूर्वापार अस्तित्वात आहेत. या गटातील व्यक्तींची, या गटाची / वर्गाची देशहितासंबंधीची कल्पना आपणास मान्य होण्यासारखी नसेल. समतेला त्यांची बांधीलकी नव्हती. ' देशहित ' म्हणत असतांना ते जास्त करून आपल्याच गटाचे / वर्गांचे हितसंबंध साधन असत, या प्रकाराची टीका आपण करू शकतो. पण काही एक व्यापक राष्ट्रहिताची संकल्पना त्यांनी स्वीकारलेली होती. मुद्याची गोष्ट अशी की, सर्व लोकांचा समावेश असलेल्या समाजाचा विचार करून वागण्याची एक परंपरा अस्तित्वात होती. या परंपरेच्या अस्तित्वामुळे बेबंद, स्वार्थी सत्तास्पर्धी असे स्वरूप तेथील राजकारणाला लोकशाहीच्या प्रस्थापनेनंतरही आले नाही.

त्याखेरीज, लोकशाहीमागील तत्वप्रणाली, मूल्ये यांचाही संस्कार या देशांमध्ये दीर्घकाळ झालेला आहे. आपला गट/वर्ग यांच्यापलीकडे इतरही गट / वर्ग असतात, आणि त्या सगळ्यांना घेऊन राजकीय समाज बनत असतो याची समज तेथे अधिक रूजलेली आहे. लोक- शाहीमध्ये सर्व व्यक्तींना समान लेखले पाहिजे, राजकारणात सहभागी होणे हा सर्वांचा अधिकार आहे, आणि लोकशाहीमध्ये लोकांचे हित साधले गेले पाहिजे या विचारांचा संस्कारही तेथे दीर्घकाळ झालेला आहे.

इंग्रजांच्या बरोबर लोकशाहीचा विचार या देशात आला. या विचाराचे संस्कार अव्वल इंग्रजी काळात नवे शिक्षण घेणाऱ्या पहिल्या काही पिढ्यांवर खोलवर झाला. पण जातीजमातींमुळे विभागलेल्या आपल्या विषम समाजावर या विचाराचा काही वेगवेगळाच परिणाम झाला. लोकांना आपल्या राजकीय हक्काची जाणीव झाली आणि पारंपरिक निर्बंध दूर झाले. त्यामुळे जातिजमातीची राजकीय अस्मिता जागी झाली. त्यातून जातीजमाती आपापल्या अस्मितांचा फुटीर परिपोष करण्यास प्रवृत्त झाल्या. या साऱ्या वेगवेगळ्या जातिजमातींचा मिळून एक राजकीय समाज आहे ही जाण मात्र वाढली नाही. ती वाढण्याच्या आड या अस्मिता आल्या.

राष्ट्रसभा ज्यांनी स्थापन केली ते मात्र अशा फुटीर अस्मितेच्या पलीकडे पोचलेले होते. हिंदुस्थानात इंग्रजांच्या एकछत्री अंमलामुळे प्रशासकीय पातळीवर एक राष्ट्र निर्माण झालेले असले तरी पाया- भरणीच्या आधीच कळसाची उभारणी केल्यासारखी ही गोष्ट झालेली आहे याची जाण त्यांना होती. राजकीय समाजाची निर्मिती कशी होऊ शकेल, त्यासाठी काय केले पाहिजे, कोणती पथ्ये सांभाळली पाहिजेत याचा विचार ते करीत होते.

पण हे काम पूर्णत्वाला गेले नाही. एका बाजूला आपापल्या जातिजमातींच्या अस्मिता आड आल्या. दुसरीकडे इंग्रजांनी अवलंबि- लेली फोडा व झोडा ही नीती आड आली. तिसरीकडे, स्वार्थी, संकुचित व फुटीर राजकारणाला इंग्रजांनी सर्व थरावर खतपाणी दिले. या प्रतिकूल परिस्थितीतही राष्ट्रासंबंधी, राष्ट्रहितासंबंधी एक व्यापक व समंजस धारणा सजविण्याचा प्रयत्न काँग्रेसच्या नेतृत्वाने केला. त्याला काही प्रमाणातच यश आलेही.

## काँग्रेसचे अपयश

पण काँग्रेसला हे यश टिकविता आले नाही. कारण स्वातंत्र्यानंतर कॉंग्रेसने विशेषतः पं. नेहरूंनी सर्व भिस्त शासनावर ठेवली. देशव्यापी एकछत्री शासनाच्या अस्तित्वातून आणि आधुनिकीकरणाच्या व औद्योगीकरणाच्या प्रक्रीयांमधून ही किमया घडून येईल असा भरवसा त्यांनी बाळगला. झाले असे की, राजकीय अस्मिता जागृत झालेल्या व्यक्तिंनी गटांनी व जांतिजमातीनी आपल्या स्वार्थी व संकुचित उद्दिष्टां - साठी राजकीय सत्ता आणि आधुनिकीकरणाच्या व औद्योगीकरणाच्या प्रक्रिया राबविल्या. जातिजमातीचा संकुचित विचार न करता राष्ट्राचा विचार करावा हा संस्कार झालेली वरिष्ठ नेत्यांची पिढी जशी कालवश झाली तशी व्यक्तिनिष्ठ, गटनिष्ठ, जातजमातवादी राजकारण कुशलतेने करणाऱ्यांची पकड वाढत गेली.

हे कसे घडून आले? आपण असे पाहिले की स्वातंत्र्यपूर्वकाळातही स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पातळीवर व्यक्तिनिष्ठ, गटनिष्ठ, जात-जमातनिष्ठ राजकारणाचाच प्रभाव होता आणि राष्ट्रीय पातळीवरही राजकारणाचा हा प्रवाह अगदी क्षीण नव्हता. हे सर्व राजकारण मागण्यांचे लाभ पदरात पाडून घेण्याचे राजकारण होते. या राज- कारणाचा एक पैलू लक्षात घेणे महत्वाचे आहे. हिंदू समाजापुरता

विचार केला तर उच्चवर्णियांशी एक सर्वस्पर्शी लढा असेही या राजकारणाचे रूप होते. आपल्या समाजात आढळणारी सामाजिक, आर्थिक व राजकीय विषमता ध्यानात घेतली तर अशा लाभांच्या, मागण्यांच्या राजकारणासही समर्थन आहे आणि असे राजकारण उच्चवर्णियांना प्रतिपक्षीय समजून करण्यालाही समर्थन होते ही गोष्ट आपणास मान्य करावी लागते.

हीदेखील एक वस्तुस्थिती आहे की स्थूलमानाने भारतीय स्वातंत्र्याचा लढा हा उच्चवर्णियांच्या नेतृत्वाखाली लढला गेला आणि स्वातंत्र्यानंतर त्यांच्या हाती राजकीय सत्ता आली. आपण बहुजन समाज म्हणतो त्या थरातील नेत्याचे स्थान काँग्रेसमध्ये दुय्यमतिय्यम होते. याचे एक गमक म्हणजे जिल्हा काँग्रेसचे अध्यक्षपद बहुतेक ठिकाणी त्याच्या हाती नव्हते. स्वातंत्र्यानंतर त्यांच्या आकांक्षा वाढल्या. त्यांच्या संख्याबळाचे भान त्यांना झाले. बहुसंख्यांचे राज्य अशी लोक- शाहीची व्याख्या केली गेली, त्याचा अर्थ त्यांनी जातिधिष्ठित समाजाच्या चौकटीत लावला. आता आपले राज्य झाले पाहिजे असे त्यांना मनोमन वाटले. तसा आग्रह निर्माण झाला.

त्यांची ही आकांक्षा रास्त होतीही आणि नव्हतीही. वेगवेगळ्या जातीजमातींमध्ये लोकसंख्येची जशी विभागणी झालेली होती त्यांच्याशी तरी काही प्रमाण साधून वेगवेगळ्या जातीजमातींमधील व्यक्तींचा आढळ राज्यकर्त्यामध्ये होताना दिसावयास सुरूवात होणे आवश्यक होते. रास्त नव्हती या अर्थाने की लोकशाहीतली बहुसंख्या ही अशी जाती जमातीच्या अनुषंगाने ठरावी हे लोकशाहीच्या मागे असलेल्या तत्व प्रणालीशी विसंगत होते पण लोकशाही राजकीय प्रक्रियाच फक्त डोळ्यासमोर ठेवली तर आपल्या सामाजिक संदर्भात तसा अर्थ लावला जाणे स्वाभाविक होते.

ही आकांक्षा चटकन फलदूत झाली नाही. याला उच्चवर्णीय पुढाऱ्यांचा कावा कारणीभूत आहे असा समज बहुजन समाजातील पुढाऱ्यांचा झाला. त्यामुळे ब्रिटिश जसे घालवले तसे उच्चवर्णीय घालविले पाहिजेत अशा निष्कर्षावर ते आले. नेतृत्व करू इच्छिणा- याच्या ठिकाणी पात्रता असली पाहिजे. पांढरपेशी संस्कृति असली पाहिजे, त्याला इंग्रजीत सफाईने व्यवहार करता आला पाहिजे. त्याने जाती जमातीचा विचार न करता केवळ राष्ट्रीय हिताचा विचार केला पाहिजे, इत्यादी दंडक हे वस्तुतः आपल्या वाटा अडविण्यासाठी पुढे केले जातात अशी त्यांची समजूत झाली. कॉंग्रेसमधील उच्चवर्णीय पुढाऱ्यांपैकी पुष्कळांच्या ठिकाणी उच्चभ्रू अहंकार होता. यात काही बाबतीत साहेबाचेच राज्य पुढे चालू राहिल्यामुळे आय. सी. एस. ही संस्था - काही गोष्टींना अतिरिक्त महत्व दिले गेले. त्यामुळे 'पात्रते' चा मुद्दा पांढरपेशी चालचलणुकीशी, इंग्रजी बोलण्या लिहिण्याशी असा काही जोडला गेला की बहुजनसमाजीय पुढाऱ्यांच्या इतर गुणांकडे दुर्लक्ष व्हावे; त्यांना दीर्घकाळ उमेदवारी करण्याची पाळी यावी.

**बहुजन समाजाचे सत्ताग्रह**

परिणामी, काँग्रेसमधील हे नेतृत्व बिथरले, त्यांनी व्यक्तिनिष्ठ, जातजमातनिष्ठ राजकारणी प्रवाहाशी जुळवून घेतले. इतकेच नाही तर त्या प्रवाहाचे पुढारीपण आपल्याकडे घेतले. लोकशाहीतल्या राजकीय प्रक्रियेत संख्याबळाला आणि हुकमी मते मिळविण्याला असलेले महत्व ओळखून त्या आधारे त्यांनी उच्चवर्णीय नेतृत्वाला शह दिला. त्यांचा डाव यशस्वी झाला तेव्हा बहुजन समाजाचे राज्य स्थापन झाले. पारंपरिक व्यवस्थेमध्ये पूर्वीच्या काळी जातीजातीमध्ये व्यक्तिनिष्ठ, गटनिष्ठ अशी स्पर्धा सत्तेसाठी चालत असे, आणि जो यशस्वी होई त्याची स्वार्थी, बेबंद सत्ता प्रस्थापित होई. सर्वस्वी त्या प्रकारचे नसले तरी त्याच परंपरेतले हे राज्य होते, कारण त्याच प्रकारच्या स्पर्धेतून ते अस्तित्वात आले होते आणि बहुजन समाजाच्या पुढा- यांची धारणाही त्याच प्रकारची होती. आपल्या अनुयायांचीही त्यांनी तशी धारणा बनविली होती.

राजकीय सत्तेच्या स्पर्धेत यशस्वी झालेले आणि न झालेले अशा सर्वाचा मिळून राजकीय समाज बनतो आणि या समाजाचा कारभार कोणत्या धोरणांनी चालणे त्याच्या हिताचे आहे हा मुद्दा राजकारणाच्या गाभ्याशी असतो, हा विचार जेथे रुजलेला नसतो. तेथे राजकीय समाज अस्तित्वात नसतो. हे आपण वर पाहिले आहे. अशा ठिकाणी संकुचित व स्वार्थी व्यक्तीनिष्ठ व गटनिष्ठ सत्ता- स्पर्धेला शेरास सव्वाशेर ठरणारी दंडसचाच वेसण घालू शकते. अशी सत्ता स्वतःच स्वार्थी व बेबंद असू शकते वा ती ब्रिटिश राजवटी- सारखी काही एका राजकीय सिद्धान्तप्रणालीने नियमित झालेली असू शकते पण अशा प्राधिकारवादी प्रबल राज्यसत्तेच्या अभावी लहान मोठ्या राज्यसत्तांमध्ये तो समाज विघटित होण्याचा धोका उत्पन्न होतो.

भारतात व्यवहारात अशा धारणेच्या आधारावर राजकीय समाज अस्तित्वात नसतानाही ब्रिटिश राजवटीने लादलेल्या एकात्म- तेच्या

छत्राखाली काँग्रेसने राजकीय समाजाला अनुरूप राजकीय परंपरा निर्माण केली, उच्चवर्णीय नेतृत्व उखडून टाकण्याच्या राज- कारणांचा एक परिणाम असा झालेला आहे की ही परंपराही उखडली गेली.

१९६७ च्या निवडणुकांपासून घडलेल्या घटना या ही परंपरा उखडली गेल्याच्या द्योतक आहेत. इंदिरा गांधींची आणीबाणीतील राजवट हा त्या वरचा एक तोडगा होता. शेरास सव्वाशेर अशा व्यक्तीनिष्ठ, बेबंद, स्वार्थी राजवटीचा तो तोडगा १९७७ च्या मार्चमध्ये लोकांनी अमान्य केला असे दृश्य दिसले. पण राजकीय समा- जाच्या अस्तित्वाच्या अभावी वर्ष दीडवर्षाच्या आत परिस्थिती अशी निर्माण झाली आहे की, अशा सत्तेकडून वेसण घालून घेतली पाहिजे हे म्हणणे प्रतिष्ठा पावावे.

काँग्रेस पक्षाला धरूनच आतापर्यंतचे विवेचन प्रामुख्याने केले आहे, कॉग्रेस सोडून इतर पक्ष आहेत त्यांचे काय? विशेषकरून समाजवादी, साम्यवादी पक्षाचे काय असा प्रश्न केला जाईल.

**डाव्यांची हतबलता**

भारतात १९२० नंतरच्या काळात औद्योगिक कारखानदारी अस- लेल्या शहरामधून कामगार संघटनांच्या बांधणीचे काम पुष्कळ झाले किसान सभांचे संघटनही करण्याचे प्रयत्न झाले. आधुनिक भांडवल शाहीबरोबर समाजाची रचना वर्गीय धाटणीची होणे अपरिहार्य आहे; तो ऐतिहासिक विकासक्रमच होय अशी मार्क्सवादी धारणा बाळग- णाऱ्यानी या संघटनांच्या बांधणीत पुढाकार घेतला. या विचार प्रणालीतून साम्यवादी पक्षाची, समाजवादी पक्षाची निर्मिती झाली. आज समाजवादी पक्ष जनता पक्षात विलीन झालेला आहे. दोन प्रमुख साम्यवादी पक्ष अस्तित्वात आहेत. इतरही फुटकळ पक्ष आहेत.

जेथे औद्योगिक कामगार वर्ग मोठ्या संख्येने अस्तित्वात आहे तेथे अशा औद्योगिक कारखानदारी शहरामध्ये आर्थिक मागण्यांसाठी ट्रेड युनियन्स संघटित झालेल्या आहेत. असे जरी असले तरी, त्या मधून कामगार वर्गाचा असा एक राजकीय पक्ष अस्तित्वात आला नाही. ग्रामीण भागात शेतमजूरांच्या संघटना अपवादानेच उभ्या राहिल्या आहेत. या डाव्या वर्गीय विचारसरणीवर आधारलेल्या पक्षांच्या 'बाबतीतही काही वैशिष्ट्ये ध्यानात घेण्यासारखी आहेत. १) व्यक्तिनिष्ठा व गटनिष्ठा यांच्यापुढे त्यांच्यात पुष्कळ फाटाफूट झालेली आहे. २) शहरी कामगार वर्ग जातीप्रमाणे विभागलेला आहे. असे सकृद्दर्शनी. आढळत नाही, पण कामगार वर्ग राजकीयदृष्ट्या एका पक्षाच्या झेंड्याखाली आढळत नाही. याचा संबंध कामगार आपल्यातव 'उच्चनीच श्रेणी पाडतात, आणि ते पाडत असताना जात आणि कामाचा प्रकार ते लक्षात घेतात याच्याशी जोडता येईल, कम्युनिस्ट पक्षाचे कार्य मुंबईच्या गिरणभागात १९२० च्या आसपास सुरू होऊनही, मुंबईची जशी औद्योगिक वाढ झाली तसा मुंबईतला सगळा औद्योगिक कामगार वर्गदेखील कम्युनिस्ट पक्षाला आपल्या पक्षात खेचून आणता आला नाही. कारखानदारी कामगाराच्या पलिकडचा श्रमिक वर्गहीं त्यांना सगळा आपल्या पक्षात आणता आला नाही. याची कारणे आपल्या जातिधिष्ठित समाजव्यवस्थेत सापडतात. ग्रामीण भागातल्या शेतमजूर संघटना या एका अंगाने जातीय संघट- नाही असतात. जेथे शेतमजूर वर्ग एकाच जातीतून बव्हंशी येतो. तेथेच शेतमजूर संघटना बांधता आलेल्या आहेत. जातींच्या दृष्टीने संमिश्र अशा मजूरांची संघटना एकेका कारखान्याला, वा मळ्याला धरून केली जाऊ शकते, पण अन्यत्र बांधायची झाल्यास अडचणी फार येतात.

ही वैशिष्ट्ये लक्षात घेतली तर भारतातली अर्धी चळवळ ही व्यक्तिनिष्ठ, गटनिष्ठ जातजमातनिष्ठ राजकारणी प्रवाहाच्या पकडीत आहे असे विधान करणे फारसे वस्तुस्थितीला सोडून होणार नाही. कम्युनिस्ट पक्षाची ताकदही भारतातील काही भागातच पुष्कळ काळ सीमित राहिलेली आहे याचेही स्पष्टीकरण जातिपातींच्या भिन्न भिन्न प्रादेशिक व्यूहांमध्ये अंशतः शोधावे लागते.

जातिव्यवस्थेत मुरलेल्या आपल्या समाजातील व्यक्तींना आणि गटांना आपल्या संकुचित स्वार्थासाठी, संघटित होण्याची स्पर्धा करण्याची शिकवण फार चटकन अंगवळणी पडते. स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या देशात राजकारणाला ऊत आलेला आहे त्यांचे कारणच हे आहे की सत्तास्पर्धेचे राजकारण हे पूर्वीही आपल्या ऐहिक जीवनाचे सारतत्व होते किंबहुना, लोकशाही राज्यव्यवस्था ही सत्ता- स्पर्धेच्या राजकारणाला कितीतरी पटीने अधिक अनुकूल आहे हे मुरब्बी लोकांच्या लक्षात आले व त्यामुळे सत्तास्पर्धेच्या राजकारणाला बहर आलेला आहे.

एका बाजूला लोकशाही राजकीय प्रक्रिया ही विभिन्न हितसंबंधी गटांच्या सत्तास्पर्धेवर, त्यांच्यात वेळोवेळी प्रस्थापित होणाऱ्या

तोलांवर ( ज्याला आपण ' बहुमताचे राज्य' असे म्हणतो) आधारलेली आहे. पण तिथेच ती जर थांबली तर समाजाची धारणा होणे शक्य नाही. कारण समाजात सतत व केवळ संघर्षाचे वातावरण निर्माण होत राहील. आपल्या सर्वोचा मिळून एक राजकीय समाज आहे आणि तो उत्तम स्थितीत राखण्यासाठी आपापल्या संकुचित स्वार्था- पलीकडे जाऊन समाजाचा विचार करणे म्हणजे परमार्थाचा विचार करणे असे जर मानले तर राजकारण हे स्वार्थासाठी करावयाचे नसून परमार्थासाठी करावयाचे असते, ही निष्ठा समाजधुरीणांच्या ठिकाणी ज्या प्रमाणात असते त्या प्रमाणात समाजाचे सातत्य टिकून राहते, समाजाची धारणा होते. ही निष्ठा लोकशाही राजकीय प्रक्रियेमधून स्वाभाविकपणे निर्माण होत नाही. लोकशाहीची जी तत्वप्रणाली आहे तिने पाश्चिमात्य देशांमध्ये जे विशिष्ट रूप धारण केले आहे तीमधूनही ही निष्ठा स्वाभाविकपणे निर्माण होत नाही.

**ग्रीक व रोमन विचारांचा वारसा**

युरोप-अमेरिकेत ही निष्ठा समाजाचे धुरीणत्व करणाऱ्या आणि करू इच्छिणाऱ्या राजकारणी माणसांमध्ये आढळून येत असली तर त्याचे श्रेय राज्यव्यवस्था व राजकारण या विषयीच्या ग्रीक व रोमन विचारांच्या वारशाला आहे. दीर्घकाळपर्यंत राज्यकारभारात सहभाग देण्याचा अधिकार फार थोड्या लोकांना होता ही गोष्ट आपल्याला माहीत आहे. यात विषमता होती, दडपणूक होती, शोषण होते, अन्याय होता हे न नाकारताही त्या पाठीशी असलेली एक समजूत लक्षात घेणे उद्बोधक ठरेल. आपली उपजीविका हस्तगत करण्यातच जो सर्वस्वी गुंतलेला नाही, पोटापाण्याच्या काळजीपासून जो मुक्त आहे, आपले ऐहिक हितसंबंध जपले जातील याबद्दल जो निश्चिंत आहे, आणि म्हणून समाजाच्या कारभारात सहभाग द्यायला जो मोकळा आहे, स्वतंत्र आहे त्याच्याच ठिकाणी नागरिकांचे कर्तव्य पार पाडण्यास लागणारी क्षमता असू शकते म्हणून त्यांचाच तेवढा राजकीय हक्कांवर ( सिव्हिल लिबर्टीज) अधिकार पोचतो अशी समजूत होती. प्रत्येक व्यक्ती नागरिक असत नाही, नागरिक कोण, तर जो सार्वजनिक व्यवहारात, निर्णयप्रक्रियेत जबाबदारीने आपला सहभाग देण्यास पात्र आहे व तयार आहे तो. त्याला राजकीय हक्क आहेत ते त्यासाठी. अशी ही स्वातंत्र्य, नागरिकत्व आणि समाजधुरीणत्व यांची सांगड घातलेली होती.

लोकशाहीमध्ये नागरिकत्वाचे हक्क एका वयात प्रत्येक व्यक्तीस जन्मसिद्ध प्राप्त होतात असे आपण मानलेले आहे. आपापला उत्कर्ष साधण्यासाठी या हक्कांवर त्याचा जन्मसिद्ध अधिकार पोचतो असेही मानलेले आहे. नागरिकत्वाचे अधिकार सर्व व्यक्तींना प्राप्त झाले ही प्रगती होती. पण समाजाचे धुरीणत्व करण्यासाठी, समाजाच्या हितासाठी आणि हिताचे राजकरण करण्यासाठी हे नागरिकत्व आहे हे अवधान सुटले, त्या प्रमाणात पाऊल मागेच पडले. व्यवहारात बेबंदशाही माजली नाही कारण जुन्या धारणा व परंपरा पूर्णपणाने खंडीत झाल्या नाहीत, पण त्या क्षीण झालेल्या आहेत. हे युरोप अमेरिकेतल्या काही घडामोडींवरून दिसून येते.

भारतामध्ये राजकीय समाजाची आणि नागरिकत्वाची अशा दोन्ही संकल्पना रुजलेल्या नाहीत. व्यवहारात त्यांना अनुरूप अशा परंपरा नाहीत. अशा परिस्थितीत जातजमातवादी पारंपरिक राज- कारणाची वर्गवादी आधुनिक राजकारणाने जागा घेतल्याने प्रश्न सुटणारा नाही. आधी मुळी आपल्या समाजाची रचना वर्गीय स्वरू- पाची नाही. त्यामुळे वर्गनिष्ठ राजकारणही वास्तविक तसे असत नाही. पण समजा ते उद्या विशुद्ध वर्गीय पायावर संघटित करता आले तरी केवळ ते 'आधुनिक' वर्गीय आहे एवढ्याने ते स्वार्थी, संकुचित बेबंद असणार नाही असे मानण्यास काही आधार नाही. जातजमात निष्ठ राजकारणाऐवजी वर्गीय राजकारण येथे रुजविण्याची आवश्यकता आज भारतातले डावे, पुरोगामी राजकारणी सातत्याने प्रतिपादत असतात. आपल्या समाजापुढील राजकीय समस्यांची त्यांना सम्यक उकल न झाल्याचेच हे लक्षण आहे.

**वर्गीय राजकारणाची भ्रामक कल्पना**

ज्याला आपण वर्ग म्हणतो त्या प्रकारच्या गटांमध्ये वा थरांमध्ये समाजाची विभागणी कोणत्याच देशामध्ये नीटपणे होऊ शकत नाही ही वस्तुस्थिती आता सोविएत रशियासारख्या देशातही उघड होत आहे. भांडवलशाहीच्या एका अवस्थेत, समाजात बूर्ज्र्या भांडवलदार आणि कामगार असे दोनच वर्ग रहाणार असा आभास निर्माण झाला. : पण त्याही वेळी तो आभासच होता, कारण ठळकपणे उठून दिस- णाऱ्या नव्या घडामोडीच्या पलीकडे बघणाऱ्यास समाजाची विभागणी इतरही सूत्रांच्या अनुषंगाने होत असलेली

दिसू शकली असती. आणि ही सूत्रे हरेक समाजात एकत्र नाहीत हेही लक्षात आले असते.

भारतात आणखी बराच काळ काही काही मुद्यांवरून जातजमात- निष्ठ राजकारणाला एक निश्चित प्रयोजन आहे ही गोष्ट पूर्वास्पृश्य आदीवासी आणि धार्मिक अल्पसंख्य यांच्या संदर्भात ध्यानात येण्या- सारखी आहे. त्यांची रास्त हितसंबंधाची पूर्तता एखी होणे कठीण आहे. भाषा, धर्म, प्रादेशिक वैशिष्ट्यें, शेतीतील विभिन्नता, उद्योग- धंद्याच्या आकाररचनातील विविधता या सारखी वैशिट्ये लक्षात घेतली तरी समाजाची बांधणी, मध्ये मोठी दरी असलेल्या मालक व मजूर अशा दोन वर्गामध्ये कधी काळी होईल असे मानणे भ्रामक आहे हेदेखील वस्तुतः लक्षात यावयास पाहिजे. जातजमात, वर्ग व्यावसायिक संघटना, भाषिक व प्रादेशिक समाज, अशा वेगवेगळ्या प्रकारच्या गटांच्या आधारे येथील राजकारण चालणार व त्यात गैर काही नाही..

गैर आहे ती वेगळीच गोष्ट. आपण आपल्या गटाच्या हितसंबंधाचे. राजकारण करीत असलो तरी तेवढ्याच प्रकारच्या राजकारणावर समाजाची धारणा होऊ शकत नाही. ज्या बृहत्तर समाजाचे आपण घटक आहोत त्या समाजाच्या हिताचे राजकारण करण्याची जबाबदारी पार पाडल्यानेच समाजाची धारणा होत असते, ही जाणीव नाही ही गोष्ट गैर आहे. राजकीय समाज, नागरिकत्व आणि नागरिक स्वातंत्र्ये वाहक यांच्यासंबंधी योग्य समज नाही ही गोष्ट गैर आहे.

म्हणजे एक प्रकारे आपण राष्ट्रसभेची स्थापना करण्यात पुढाकार घेणाऱ्या रानड्यांच्या पिढीपर्यंत परत एकदा मागे जातो. त्यांच्यासमोर जे आव्हान होते तेच आज आपल्यासमोर उभे आहे. फरक एवढाच आहे की आपल्यासमोर कोणते आव्हान आहे त्याची जाणीव त्यांना तीव्रपणे होती. ती जाणीवदेखील आज पुसली गेली आहे. सांस्कृतिक राष्ट्रवाद, समाजवाद / साम्यवाद, आधुनिकीकरण या विचारप्रणालींच्या प्रभावाखाली ज्या मार्गावरून आपण वाटचाल केली त्या वाटचालीने मूलभूत समस्या दृष्टीआड होण्याचे काम झाले. चुकीची दुरूस्ती करून घेण्याची आता वेळ आली आहे.

### सांस्कृतिक राष्ट्रवाद व आधुनिक विचारप्रणाली या दोहोंचेही अपयश

स्वाभाविकच प्रश्न असा की सांस्कृतिक राष्ट्रवाद, समाजवाद साम्यवाद, आधुनिकीकरण या विचारप्रणाली याबाबत अपयशी का ठरल्या?

सांस्कृतिक राष्ट्रवादाची विचारप्रणाली अपयशी ठरण्याचे कारण दुहेरी आहे. वेगवेगळ्या धर्माचे आणि भाषेचे समाज आपल्या देशात वास्तव्य करीत असल्याने सांस्कृतिक राष्ट्रवादी भूमिका ही एकात्म राजकीय समाजाच्या निर्मितीच्या सरळसरळच आड येणारी ठरली. धर्मावरून पाकिस्तानची निर्मिती झाली. पण धर्माइतकाचा भाषेचा फरकही या दृष्टीने अडचणीचा ठरतो ही गोष्ट हिंदीवरूनची उत्तर व दक्षिण भारतातील दरी, शिवसेनेसारख्या चळवळीस मिळ- णारा पाठिंबा आणि या प्रकारच्या इतर घटनांवरून आपल्या लक्षात आता आलेली आहे.

आपली जातिव्यवस्था ही देखील एक अडचण आहे. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या स्थापनेमागील प्रमुख उद्दिष्ट हिंदू समाजाचे संघटन हे होते. पण त्यालाही आपल्या पन्नास पंचावन्न वर्षाच्या आयुष्यात हिंदू समाजातील सगळ्या जातीतल्या तरुणांना एकत्र आणता आले नाही. सांस्कृतिक राष्ट्रवाद हा उच्चवर्णियांच्या, विशेषतः ब्राह्मणांच्या वर्चस्वाधारित नातिप्रणालीचा व जीवनसरणीचा पुरस्कार ठरतो आणि असा पुरस्कार अन्य जातीयांकडून आपलेपणी स्वीकारला जाणे जवळपास अशक्य आहे.

समाजवाद साम्यवादाची शोकांतिका वेगळी आहे. युरोपीय इतिहासाच्या एका टप्प्यावरील तत्कालिन ठळक प्रवाहांवर आधारित असलेल्या या विचारसरणी आहेत. या विचारसरणीनुसार समाजातील वेगवेगळ्या वर्गाचा मिळून एक जिकीय समाज असतो, ही गोष्ट मुळातच नाकारलेली आहे, श्रमिक वर्ग सोडून इतर वर्गीचे अस्तित्व संपुष्टात आणणे हे कामगार वर्गाचे राजकीय उद्दिष्ट मानलेले आहे. इतर वर्गाचे अस्तित्व संपुष्टात येण्यानेच खऱ्या अर्थाने प्रथमच एकात्म राजकीय समाज अस्तित्वात येणार हा ठाम सिद्धांत असल्याने ती क्रांती घडून येईपर्यंत यादवी युद्धाची परिस्थिती हीच स्वाभाविक व योग्य मानली गेलेली आहे, असे असल्यामुळे राज्यक्रांती होईपर्यंत कामगार वर्गाने केवळ आपल्या स्वार्थासाठी झगडावे. प्रस्थापित व्यवस्था खिळखिळी होण्यासाठी जास्तीत जास्त प्रयत्न करावेत ही गोष्ट योग्य ठरते. सगळ्या समाजाच्या हिताहिताचा विचार करणे हे अयोग्यच ठरते. व्यवहारात वर्ग संघर्षाची शिकवण ही संकुचित स्वार्थ बेबंदपणे साधण्याचीच शिकवण ठरते. कोणताही संघर्ष हा आपल्या आर्थिक वा राजकीय शत्रूशी आहे असे

मानल्यावर संयमाचा, त्यागाचा सारासार विचार ही सगळी दुबळेपणाची लक्षणे ठरतात. राज्य क्रांतीनंतर काय हा प्रश्न उद्भवत नाही. कारण पूर्वीची सवय मोडण्यासाठी सर्वकष पक्षीय राज्यसत्ता दंडसत्तेचा अमर्याद वापर करावयास सज्ज असतेच. जी राज्यसत्ता असा वापर करू इच्छित नाही तिला आपला गाशा लौकरच गुंडाळावा लागतो असा अनुभव आहे. तात्पर्य असे की समाजवाद - साम्यवाद यामध्ये जी वर्ग संघर्षाची भूमिका आहे की ती बुद्ध्याच गद्यस्थार्थास प्रोत्साहन देणारी आहे.

भारतीय लोकशाही समाजवादी चळवळीवर गांधीविचाराचाही, स्वातंत्र्यलढ्याच्या काळातील काँग्रेसच्या सर्वांना बरोबर घेऊन जाण्याच्या भूमिकेचा संस्कार झालेला असस्थाने वर्ग संघर्षाची भाषा एका बाजूला होत असली तरी व्यवहार वर्गयुद्धाच्या पद्धतीचा दरवेळी होत आलेला नाही म्हणून विचार आणि कृति या दोन्हीच्या बाबतीत त्यामुळे गोंधळाची परिस्थिती निर्माण झालेली आहे.

आधुनिकीकरणाच्या बाबतीतली अडचण अशी की ही विचार - प्रणाली व्यक्तीवादावर आधारलेली आहे. ही विचारप्रणाली व्यक्ती-वादी भूमिकेतून कोरडा व्यवहारवाद व्यक्तींच्या ठिकाणी विसंबते.. आपला स्वार्थ अधिक चांगल्या रीतीने साधण्यासाठी संघटना बांधणे, सौदेबाजीच्या भूमिकेतून तडजोड करणे या गोष्टी या विचारप्रणालीशी सुसंगत आहेत. आपला सर्वोचा एक समाज आहे अशी धारणा समाजांमध्ये आधीपासून रुजलेली आहे. त्यांच्या बाबतीतही या विचार- प्रणालीमुळे काही प्रश्न निर्माण होताना आपण आज पहात आहोत. जगातील निर्धन राष्ट्राच्या बाबतीतली सधन राष्ट्रांची स्वार्थी व संकु चित भूमिका आपल्या अनुभवाची गोष्ट आहे. त्या त्या देशांतर्गतही आपापल्या स्वार्थास चिकटून राहण्याच्या आग्रहामुळे राष्ट्र कसे पेचात येते ते आपणास इंग्लंडमधील अलिकडील घडामोडीमुळे दिसून येते. काँश व्हेंटिव्ह वा मजूर दोन्ही पक्षांना इंग्लंडची परिस्थिती काबूत आणणे अत्यंत अवघड जात आहे. युद्धाच्या प्रसंगी किंवा शीत- युद्धाच्या वातावरणातच शिस्त, संयम, त्याग या गोष्टी शक्य होतात असे दिसते.

सांस्कृतिक राष्ट्रवाद, साम्यवाद - समाजवाद आधुनिकीकरण या विचारप्रणालीच्या आधारे राजकीय समाजाची जाणीव निर्माण होणार नाही. समाजाच्या धारणेस आवश्यक अशी नागरीकत्वाची व नागरिक स्वातंत्र्याची संकल्पना रुजणार नाही ही गोष्ट आता स्पष्ट होईल.

**सर्वकष वैचारिक मांडणीची आवश्यकता**

ही राजकीय समाजाची, नागरिकत्वाची, नागरिक स्वातंत्र्याची कल्पना कशी रुजते? त्यासाठी काय करायला हवे?

समाजातल्या सर्व थरांतील व्यक्तींना आपल्या कर्तृत्वाला वाव आहे, आपल्या कर्तृत्वाचे चीज होते, समाज आपल्या कामगिरीचे कौतुक करतो या प्रकारची अनुभूती येण्यातून सामाजिक एकात्मता निर्माण होते. आपल्या ठिकाणच्या कर्तृत्वाच्या गुणांच्या आविष्काराला समाजातील प्रस्थापित चौकटीचा अडथळा होत नाही ही अनुभूती विशेष महत्वाची आहे असे दिसते.

एका मोठ्या व दीर्घकालीन संकटाला तोंड द्यावे लागल्यास त्यातूनही सामाजिक एकात्मता निर्माण होते. युद्ध ही अशी एक घटना आहे. पण असे घडून येईलच असे मात्र नाही. युद्धातून हा परिणाम साधण्यासाठी योग्य नेतृत्वाची आणि वैचारिक नैतिक वाता-वरणाची आवश्यकता असते.

असेही दिसते की समाज कशाला म्हणतात; त्याची धारणा 'कशी होते; मानवी स्वभाव काय, समाजाची गरज कशासाठी आहे; सामाजिक व्यवस्था कशाला म्हणतात; तिच्या निर्मितीमध्ये मानदंडाचे कार्य कोणते, इत्यादी मूलभूत प्रश्नांच्या अनुषंगाने केलेली एक सर्वेका वैचारिक मांडणी समाजात मान्य असणे, तिचा प्रभाव असणे याचीही समाजधारणेसाठी आवश्यकता असते.

अशा प्रकारच्या सर्वकष मांडणीलाच अलिकडच्या काळापर्यंत आपण धर्म असे म्हणत आलो. आधुनिक काळात अशा सर्वेका मांडण्या कोणी केलेल्याच नाहीत असे नाही पण आता या मांड- ज्यांची एक अखंड परंपरा आधुनिक काळात दिसून येते. अशी मांडणी करणाऱ्यांना अलिकडे आपण तत्त्वज्ञ, अर्थशास्त्रज्ञ असे पुष्कळदा म्हणतो. मार्क्स हा परंपरेतील एक महापुरुष होऊन गेला. धर्म हा शब्द आपण वापरलाच पाहिजे असे अर्थातच नाही. जीव- नाच्या सर्व अंगांना स्पर्श करणारी ही मांडणी असली पाहिजे, आणि जीवनाची सर्व अंगे परस्परांशी अनुबंधित असतात, कोणतेही क्षेत्र सर्वस्वी स्वायत्त असत नाही; हे त्या मांडणीचे गृहीत कृत्य असले पाहिजे.

ज्याला काही ना काही इतिहास आहे असा कोणताही समाज अशी मांडणी दुसऱ्या समाजापासून उसनवार घेऊ शकत नाही. याचे एक साधे कारण आहे. समाजाची धारणा अधिक चांगली व्हावीं ही अशा मांडणीमागची प्रेरणा असल्याकारणाने त्या मांडणीला स्थलकालांचा संदर्भ असतो. मानवी समाजाच्या धारणेचे प्रश्न एका अंगाने सनातनच आहेत. पण त्या प्रश्नांची उत्तरे स्थलकालानुसार वेगवेगळी दिली गेलेली आहेत. याचे कारण मानवी स्वभावाची जाण, तत्कालीन भौतिक परिस्थितीतून उपजीविका हस्तगत करण्यात येणारे प्रश्न, माणसांचे संचित ज्ञान, त्याच्या दृष्टीने त्याला त्यावेळी महत्वाचे वाटत असलेले प्रश्न, श्रेयस्कर काय यासंब- धीची त्याची कल्पना अशा वेगवेगळ्या मुद्यांवरून परिस्थिती वेगवेगळी राहत आलेली आहे. आणि म्हणून दुसऱ्या समाजापासून मांडणीच्या बाबतीत अशी उसनवारी करता येत नाही. त्या त्या समा- जाची विशिष्ट घडण असते, परंपरा असते, ठेवण असते आणि त्यामुळे कालचक्राच्या कोणत्याही एका क्षणी त्या समाजाचे प्रश्न अजोड असतात. त्या प्रश्नांचे आकार अजोड असतात. म्हणून अशी मांडणी प्रमाणसापेक्ष करावी लागते.

पण याच कारणास्तव आपल्या उज्वल परंपरांचे पुनरुज्जीवन करू पाहणारी मांडणीही पुरी पडत नाही. उदाहरणार्थ, वैदिककालीन संस्कृती ही सर्व जगाला आदर्श वाटावी अशी थोर होऊन गेली असेलही कदाचित पण तिचा आश्रय आज घेता येत नाही कारण आज सगळ्याच मुद्यांवरून आपली स्थिती वा भूमिका वेगळी आहे. म्हणून सांस्कृतिक राष्ट्रवाद पुरा पडत नाही.

भारताच्या प्राचीन वारशाशी धागा जुळवून घेऊन सद्यकालीन समस्या आणि दृष्टी यांच्या आधारे समग्र, सर्वकर्ष मांडणी करण्याचे प्रयत्न ब्रिटिश राजवटीच्या आरंभापासून झालेच नाहीत असे नाही. महाराष्ट्राच्या संदर्भात अशी मांडणी करण्याचा एक लक्षणीय प्रयत्न न्यायमूर्ती रानड्यांनी केला असे आपण म्हणू शकतो. त्यांच्या खेरीज त्यांच्या तोलामोलाचे नाव आपणास महाराष्ट्राच्या संदर्भात दुसऱ्या कोणाचे घेता येत नाही. अखिल भारतीय संदर्भात अशी सर्वकष मांडणी करणाऱ्यांची नावे काढावयाची म्हटले तर कदाचित राजा राममोहन राय, रवींद्रनाथ टागोर आणि महात्मा गांधी यांचीच तेवढी नावे घेता येतील. मार्क्सपासून प्रेरणा घेऊन मार्क्सला गुरू मानून अशी मांडणी करणारा अद्यापपावेतो तरी कोणी पुढे आलेला आढळत नाही.

भारतात एकात्म राजकीय समाज निर्माण व्हावा यासाठी दीर्घ- कालीन युद्धासारखी आपत्ती कोसळावी अशी प्रार्थना करणे चुकीचे होईल. पण कधी कधी तसे मनात यावे इतकी निराशा वाटते ही गोष्ट खरी आहे. युद्धाचा मार्ग वर्ज्य मानला तर मग ही गोष्ट कशी घडून येईल?

भारतातील राज्यसत्ता लोकशाहीवादी आहे की एकाधिकारवादी आहे या गोष्टीस या संदर्भात विशेष महत्त्व नाही, ही गोष्ट प्रथमदर्शनी धक्कादायक वाटते. लोकशाहीच्या औपचारिक चौकटीत कार्य करणारी राज्यसत्ता सर्वसामान्य माणसाला कशी अनुभवास येते ही गोष्ट लक्षात घेतली तर वरील विधान इतके चमत्कारिक वाटणार नाही. मत्ता सत्ता असलेल्यांची हुकूमत या देशात चालते हाच सर्वसामान्य माण- साचा रोजचा अनुभव आहे. या सत्तामत्तावाल्यांना निष्प्रभ करण्यासाठी या देशात ' आणिबाणी राजवटच ' आजावयास हवी, अशा राज- वटीच्या हातूनच सर्वसाधारण गोरगरीबांच्या अभ्युदयाच्या वाटा मोकळ्या होणार आहेत हा युक्तिवाद इंदिरा गांधी करतात तेव्हा तो लोकांना विचार करण्याजोगा वाटतो ही गोष्ट याचीच द्योतक आहे. लोकशाहीच्या औपचारिक चौकटीचे काहीच महत्त्व नाही असा याचा अर्थ नाही. पण अशा चौकटीत चालणाऱ्या राज्याचा अनुभव लोकांना कसा येतो ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे.

### लोकशाहीची औपचारिक प्रस्थापना पुरेशी नाही

या देशात गुणी, कर्तृत्ववान व नेक माणसांची वाण आहे अशातला भाग नाही. आज सर्व क्षेत्रांमध्ये व थरावर त्यांना आपली. कोंडी झाल्यासारखे वाटते. सर्वसामान्य बहुजन समाजातील गुणी माणसास या राज्यात आपल्या गुणांची कदर केली जाते, आपल्या कर्तृत्त्वाला वाटा मोकळ्या आहेत असा अनुभव येणे अतिशय महत्त्वाचे आहे. महाराष्ट्राच्या इतिहासात डोकावून पाहिले तर शिवाजी महा- राजांची थोरवी नेमकी या वैशिष्ट्यात आहे असे आपणास आढळते. लोकशाहीची औपचारिक चौकट त्या काळी अस्तित्वात नव्हती. पण हे आपणा सर्वांचे राज्य आहे आणि त्याचे आपण रक्षण केले पाहिजे ही भावना लोकांच्या ठिकाणी निर्माण करण्यात आणि दृढपणे रुजविण्यात त्यांना यश आले. छोट्यामोठ्या वतनदारांची सत्ता त्यांना निर्घृणपणे मोडून काढावी लागली. इंदिरा गांधींच्या

आणिबाणी राजवटीचे पर्यवसान कौटुंबिक राजवटीत झाले नसते आणि आपली हुकूमत त्यांनी गुणी, कर्तृत्ववान व नेक माणसांची कोंडी फोडण्यासाठी वापरली असती तर...? मुद्दा असा आहे की, औपचारिक दृष्ट्या लोकशाही परत एकवार प्रस्थापित केली ही गोष्ट, आपल्या देशाची जी अत्यंत निकडीची गरज आहे त्या संदर्भात आजच्या घडीला जवळजवळ अप्रस्तुत आहे.

एकात्म राजकीय समाजाच्या निर्मितीसाठी आपल्या समाजातील लोकांना स्वतःची ओळखही काही वेगळी लागण्यास सुरुवात झाली पाहिजे. त्याचप्रमाणे, व्यक्ती आणि समाज यांच्यातल्या संबंधांविषयीही एक वेगळी धारणा रुजली पाहिजे. नागरिकत्वाची संकल्पना प्रसृत केली पाहिजे आणि स्वातंत्र्याची सांगड नागरिकत्वाशी घातली पाहिजे. पण हे घडून येण्यासाठी आपल्या धार्मिक व सामाजिक तत्त्वज्ञानाची आमूलाग्र फेरमांडणी करावी लागेल.

अशी मांडणी कोण करील, कधी करील याविषयी आपणास भाकित करता यावयाचे नाही. ती केली जाईलच असेही आपण खात्रीपूर्वक सांगू शकत नाही. पण अशा एखाद्या मांडणीच्या, सर्वांगीण तात्त्विक भूमिकेच्या प्रभावाखेरीज भारतीय राजकारणाला आणि समाजाला श्रेयस्कर वळण मिळण्याची शक्यता कमी आहे.

असे असले तरी, अशा मांडणीचे काही घटक स्पष्ट करता येतील. ज्या परिस्थितीत माणसे रहात आहेत, ज्या बैठकीवरून त्यांचे व्यवहार होत आहेत, आणि त्या व्यवहाराचे जे परिणाम होत आहेत त्यांची ' ध्येयनिष्ठ दृष्टी बाळगून वस्तुनिष्ठ स्पष्टता करणे आणि तत्त्व आणि व्यवहार यांची सांगड उकलून दाखविणे हा अशा मांडणीचा एक भाग असेल. समाजस्थितीत बदल घडून येण्याच्या दृष्टीने क्रियाशील असलेल्या शक्ति - प्रवाहांचा वेध घेणे, त्यांचे बलाबल जोखणे, त्यांच्या बळाचे स्तोम स्पष्ट करणे हा दुसरा भाग असेल. श्रेयस्कर मानवी जीवन कोणते, म्हणजेच मानवी स्वभावप्रकृतीला साजेसे व्यक्तिगत व सामाजिक जीवन कोणते याबद्दलचे विवेचन हा तिचा तिसरा भाग असेल. आणि अशा इष्ट दिशेने बदल घडवून आणण्यासाठी उपकारक असे शक्ति--प्रवाह कोणते, त्यांचे बळ वाढविणाऱ्या वैयक्तिक व सामूहिक कृती कोणत्या, इष्ट वा आवश्यक नीती ( स्ट्रॅटेजी ) कोणती, अशा परिवर्तनामध्ये पुढाकार घेणारे संभाव्य घटक समूह वा वर्ग कोणते यांचे विवेचन हा चौथा भाग राहील.

### दैनंदिन अनुभूतींशी मेळ घालणारी मांडणीच यशस्वी ठरेल

कोणीतरी अशी मांडणी केली की आपसूकपणे इष्ट ते परिवर्तन घडून येईल असे नाही. ही मांडणी समाजात प्रभावी ठरण्यासाठी लोकांच्या ऐहिक जीवनातल्या दैनंदिन अनुभूतीशी तिचा मेळ बसला पाहिजे. प्रचलित समाजव्यवस्थेविषयी ज्यांच्या मनात असमाधान, असंतोष वा संभ्रम असेल त्यांच्या मनाची पकड या मांडणीने घेतली पाहिजे. ही पकड घेणे म्हणजे काय त्याची अखेरीस स्पष्टता करू या. समाजाला इष्ट ते वळण दिले जाऊ शकते ही आशा या मांडणीने मनात उत्पन्न झाली पाहिजे. उद्याचे जग आपल्या विचाराच्या लोकांचे आहे असे आश्वासन तीमधून मिळाले पाहिजे, प्रचलित समाजव्यवस्थेने आपणास जखडून टाकले असले तरी, प्रस्थापिताला आव्हान देण्याचे बळ आपणापाशी आहे, त्याची युक्ती आपणास हस्तगत झाली आहे अशी मनाची उभारणी निर्माण झाली पाहिजे, असा आत्मविश्वास उत्पन्न झाला पाहिजे. कृतीचा मार्ग स्पष्ट दिसला पाहिजे.

भारतात आज सर्वागिण तात्त्विक मांडण्यांचा अभाव आहे असे नाही. पण त्यांच्या प्रभावातून नवसमाजाच्या उभारणीचे राजकारण शक्तिमान होताना दिसत नाही. त्यांचा उपयोग समाजावरील वेग- वेगळ्या गटांच्या ठिकाणची स्वार्थाची प्रेरणा बलवत्तर करण्यासाठीच केला जात आहे असे व्यवहारात आढळून येते. म्हणजे राजकारणी लोकांच्या हातातले एक हत्यार, लोकांना आपल्या सोयीने हाताळण्याचे हत्यार म्हणून आज त्या वापरल्या जात आहेत.

ज्या ज्या वैचारिक मांडणीनुसार राज्य हे श्रेष्ठी (एलिट) वर्गाच्या हातीच राहणे योग्य असते; आणि अशा श्रेष्ठींना नाना प्रकारचे लाभ अधिक प्रमाणात मिळणे त्यासाठी इष्ट व आवश्यक असते त्या त्या वैचारिक मांडणीत लोकांना दुय्यम स्थान असते. अशा मांडणीवर निष्ठा असणाऱ्यांनी वरील स्वरूपाचे राजकारण करणे सुसंगत आहे.

पण समता, शोषणमुक्ती, सर्वोचा सहभाग या पायावर समा-- जाची उभारणी करण्याचे राजकारण ज्यांना करावयाचे आहे त्यांनी वैचारिक मांडणीचा असा उपयोग करणे विसंगत आहे. कारण त्या मधून अखेरीस अल्पसंख्य गटाची संताच व्यवहारात प्रस्थापित होते. वेगवेगळ्या गटांच्या स्वार्थी प्रवृत्तींना उत्तेजन देऊन त्यांना आपल्या छत्राखाली राजकारण करावयास मोहित करणे ही आज

डाव्या पक्षांची नीती बनलेली आहे. कसेही करून एकदा सत्ता हाती आली की मग आपल्या वैचारिक मांडणीनुसार आपण समाज घडवू अशी त्यामागची भूमिका आहे. याप्रकारे सत्ता हाती येतच नाही असे नाही. पण समताधिष्ठित शोषणमुक्त समाज अस्तित्वात येत नाही.

**नवा माणूस बनविण्यावर भर**

वैचारिक मांडणीच्या आधारे नवी माणसे घडविण्यावर भर नसल्याने या मांडण्यांना अधिकाधिक वास्तवदर्शी बनविण्याचीही गरज' वाटत नाही. उलट जादूच्या कांडीसारखे तिचे रूप अधिक सोयीचे वाटते. मार्क्सवाद, संपूर्ण क्रांती, लोकशाही समाजवाद या सत्ताकांक्षी राजकारण्यांच्या हातातील जादूच्या कांड्या बनतात तेव्हा समाजवास्तवाचे सम्यक आकलन करून घेण्याच्या दृष्टीने किती कुचकामी 'ठरतात ते आपण गेली तीस वर्षे अनुभवीत आहोत.

आपल्या संकल्पित नियतकालिकाचे उद्दिष्ट स्पष्ट करताना १८४३ साली मार्क्सने एका पत्रात लिहिलेले वाक्य येथे उद्धृत करण्यासारखे आहे. " We may sum up the out look of our Journal in a single phrase: the self know- ledge (Critical philosophy) of the age about its struggles and aims. This is a task for the world and for ourselves" आपल्या समोरही नेमके हेच कार्य आहे. मार्क्स वा गांधीची वचने उद्धृत करून किंवा त्याच्या मांडण्यांमध्ये आजचे वास्तव बसवून आत्मज्ञान) होणार नाही. त्यासाठी ध्येयनिष्ठ, डोळस, आणि चिकित्सक दृष्टी बाळगून समाजवास्तवाला प्रत्यक्ष सामोरे गेले पाहिजे, मिडले पाहिजे - जसे मार्क्स व गांधी त्यांच्या त्यांच्या काळात आपल्या सर्व ताकदीनिशी भिडले होते.